







नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)

महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,
धोबीतलाव, मुंबई - ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com

# निवेदन

महाराष्ट्र राज्याचे सांस्कृतिक धोरण २०१० अंतर्गत मराठी भाषेतील प्रतिमुद्राधिकाराची (कॉपीराइटची) मुदत संपलेले दुर्मिळ ग्रंथ महाजालावर उपलब्ध करून द्यावे असे म्हटले आहे. त्यानुसार मराठी भाषा विभागाच्या आदेशाप्रमाणे (शासननिर्णय क्र. रासांधो १०१२/ प्र. क./२०१२/भाषा-३ दि. २८ मार्च २०१३) राज्य मराठी विकास संस्थेद्वारे असे ग्रंथ आणि नियतकालिके महाजालावर उपलब्ध करून देण्याचा प्रकल्प राबवण्यात येत आहे. त्याच बरोबर प्रतिमुद्राधिकाराच्या कक्षेत येणारी काही साधनेही प्रतिमुद्राधिकारधारकांची उचित अनुमती प्राप्त झाल्यास संस्थेद्वारे संगणकीकृत करून अभ्यासकांसाठी उपलब्ध करून देण्यात येत असतात.

चित्रकार दीनानाथ दलाल ह्यांनी सन १९४७ ते १९७१ दरम्यान प्रसिद्ध केलेल्या दीपावली ह्या नियतकालिकाच्या अंकांचे संगणकीय स्वरूपात जतन करण्याबाबतचा प्रस्ताव चित्रकार दीनानाथ दलाल मेमोरिअल समिती, मुंबई ह्या संस्थेद्वारे राज्य मराठी विकास संस्थेस प्राप्त झाला होता. सदर प्रस्तावानुसार दुर्मिळ मराठी ग्रंथांचे संगणकीकरण ह्या प्रकल्पांतर्गत दीपावली नियतकालिकांचे अंक संगणकीकरण करून ते सार्वजनिकरीत्या आणि विनामूल्य उपलब्ध करून देण्यासंदर्भात राज्य मराठी विकास संस्थेद्वारे सहमती दर्शविण्यात आली.

चित्रकार दीनानाथ दलाल मेमोरिअल समिती, मुंबई ह्या संस्थेद्वारे सदर अंक संगणकीकरणासाठी उपलब्ध करून देण्यात आले. सदर संस्थेच्या सहकार्यामुळेच आपल्याला ही सामग्री संगणकीय स्वरूपात उपलब्ध होत आहे.

या अंकांच्या पीडीएफ प्रती आपण विनामूल्य उतरवून घेऊ शकता. असे करताना खालील सूचना लक्षात घेऊन त्यांचे पालन करावे.

१. सदर ग्रंथांच्या पीडीएफ प्रती या वैयक्तिक वापरासाठी विनामूल्य उतरवून घेता येतील तसेच इतरांनाही विनामूल्य देता येतील. पण कोणत्याही कारणासाठी त्याचा व्यावसायिक वापर करता येणार नाही.
२. सदर ग्रंथांचे दुवे इतरांना देताना त्यासाठी कोणतीही रक्कम आकारता येणार नाही.
३. पीडीएफ प्रतींवर असलेली राज्य मराठी विकास संस्था, मुंबई व चित्रकार दीनानाथ दलाल मेमोरिअल समिती, मुंबई यांची मुद्रा आपणास काढता येणार नाही.
४. आपल्या अभ्यासासाठी, संशोधनासाठी या सामग्रीचा उपयोग करताना आपण योग्य तो श्रेयनिर्देश केला पाहिजे.

वरील अटींचा भंग झालेला आढळल्यास कायदेशीर कारवाई करण्यात येईल.

स्पष्टीकरण : सदर सामग्री ही केवळ ऐतिहासिक दस्तऐवज म्हणून उपलब्ध करण्यात आली असून या सामग्रीतून व्यक्त होणारी मते, विचारसरणी इ. त्या त्या लेखक, संपादक इ. कर्त्यांची आहे. त्यांपैकी कोणतेही मत, विचारसरणी इ. यांचा पुरस्कार महाराष्ट्र शासन, मराठी भाषा विभाग, राज्य मराठी विकास संस्था व चित्रकार दीनानाथ दलाल मेमोरिअल समिती, मुंबई यांपैकी कुणीही करत नसून त्या त्या मताचे वा विचारसरणीचे दायित्व उपरोक्त विभागांवर/ संस्थांवर असणार नाही.

सदर अंक केवळ अभ्यासकांच्या सोयीसाठी संगणकीय स्वरूपात उपलब्ध करण्यात येत असून अंकांतील सामग्रीचे (लेखन, मांडणी, छायाचित्रे, रेखाचित्रे इ.) प्रतिमुद्राधिकार त्या त्या लेखकांकडे अथवा प्रकाशकांनी त्या त्या वेळी केलेल्या व्यवस्थेनुसार आहेत ह्याची नोंद घेण्यात यावी. त्या सामग्रीसंदर्भातील कोणतेही अधिकार वा दायित्वे राज्य मराठी विकास संस्था, मराठी भाषा विभाग किंवा महाराष्ट्र शासन ह्यांच्याकडे असणार नाहीत.

अनुक्रमणिका

# दीपावली

जानेवारी १९६५ • वर्ष २०वें • मूल्य १ रुपया

अनुक्रमणिका



# दीपावली

साहित्य-कला-संगम

जानेवारी : १९६९ वर्षं २० वें मूल्य १ रु.

## श्रे य ना मा व ली—

● **आम्ही असें लिहितों**– पु. ल. देशपांडे–प्रभाकर अत्रे ● **उत्तर दिग्विजय**–पु. भा. भावे ● **खटला**–श्रीराम कामत ● **फियास्को**–रजनी कर्णिक ● **मॅडचॅप**–आनंत घाटुगडे ● **विठ्याचा न्याय**–जनार्दन सातव ● **भूतलावर स्थिरावलेल्या देवांगना**–चित्रकार भय्यासाहेब ओंकार ● **क्लिओपॅट्रा किस्ट्रल्स**–शां. शं. रेगे ● **माय**–वामन इंगळे ● **सूळ**–डॉ. रंगनाथ देशपांडे ● **पालखी**–केशव मेश्राम ● **माझी आई**–रॉक् कॉर्व्हालो ● **विश्वमोहिनी आणि फॉनचे अलगुज**–निवेदक अ. सि. केळुसकर ● **वारसा–सौंदर्य–धन्वंतरी**–रं. कृ. चिंचलीकर ● **ऐसीं अक्षरें रसिकें मेळवीन**–प्र. श्री. नेरुरकर व श्रीपाद भागवत ● **रंगमंच**–अभिनवगुप्त ● **सन्मान पुष्पें**–आदित्य व्यंगचित्रें, इत्यादि.

दलाल आर्ट स्टुडिओ, ४२ केनेडी ब्रीज, मुंबई ४

टे. नं. ७७७६५
Gram : Dalalart

❋ संपादक-मुद्रक-प्रकाशक-मालक-श्री. **दीनानाथ दलाल**, दलाल आर्ट स्टुडिओ, ४०–४२, केनेडी ब्रीज, मुंबई ४. या प्रतीस किंमत ३ रु. + रजि. पोस्ट १ रु. वार्षिक वर्गणी दिवाळी अंकासह रु. १२॥. अंकांत प्रसिद्ध झालेलीं मतें हीं चालकांचींहि अधिकृत मतें असतातच असें नाहीं. ❋ प्रकाशित चित्रें व लेख यावरील सर्व हक्क दलाल आर्ट स्टुडिओच्या स्वाधीन आहेत.
Registered with the Registrar of Newspapers For India under No. RN 1612/57

अनुक्रमणिका

# अभक्तचा "क्षयो" केव्हां होणार ?




**दलाल आर्ट स्टुडिओ**

४२, केनडी ब्रीज, मुंबई ४.

टेलिफोन : ७७७६५ तारेचा पत्ता : DALALART

● **वर्गणीदारांस सूचना :** दीपावली व सर्व खास अंकांसह दीपावलीची वार्षिक वर्गणी रु. १२–५० पैसे. द्वैवार्षिक वर्गणी रु. २०; त्रैवार्षिक वर्गणी रु. २५ व चार वर्षांची वर्गणी रु. ३२. **परदेशीं वार्षिक वर्गणी रु. १६–००**

● **वर्गणी** मनिऑर्डरनें यावी. चेक पाठविल्यास तो दलाल आर्ट स्टुडिओच्या नांवें, मुंबई बँकेवरचा असावा. इतर ठिकाणच्या बँकेवरचा असल्यास ७५ पैसे वटणावळ जादा पाठवावी. कोणत्याहि महिन्यापासून वर्गणीदार होतां येतें.

● **अंक न पोचल्याचें** कळवावयाचें झाल्यास ५ तारखपर्यंत वाट पाहून मग कळवावें. अंक ऑफिसमध्यें शिल्लक असल्यास जरूर पाठविला जाईल.

● **जाहिरातींचा व्यवहार** हा परस्पर विश्वासाचा असतो. गिऱ्हाइकांच्या इच्छेनुसार जाहिरात छापण्याची कोशिस करण्यांत येते. तरीहि तांत्रिक अडचणीमुळें अगर अन्य कारणामुळें जाहिरातींत कमीजास्त फरक झाला तर त्याची जबाबदारी व्यवस्थापकांवर नाहीं.

● **साहित्याच्या स्वीकृतीचा** निर्णय महिनाभरांत सामान्यतः कळविला जातो. **पोस्टेज असलेलें** नापसंत साहित्य परत पाठविलें जातें. पुरेसें पोस्टेज नसल्यास तें निकालांत काढलें जाईल.

● **स्वीकृत अगर इतर साहित्य** गहाळ झालें तर त्याची जबाबदारी व्यवस्थापकांवर नाहीं.

संपादक, मालक, मुद्रक व प्रकाशक श्री. **दीनानाथ दलाल यांनीं** स्टेट्स पीपल प्रेस, जन्मभूमी भवन, घोगा स्ट्रीट, फोर्ट, मुंबई १ येथें छापून, दलाल आर्ट स्टुडिओ, ४२ केनडी ब्रीज, मुंबई ४ येथें प्रसिद्ध केलें.

**दुरिताचें तिमिर जावो ! विश्व स्वधर्म सूर्यें पाहो**
**जो जें वांछील तो तें लाहो । प्राणिजात.**
**—ज्ञानेश्वरी**

ज्ञानेश्वरींतें हें पसायदान म्हणजे साऱ्या सद्धर्माचें अधिष्ठान ! साऱ्या राज्यशासनाची प्रतिज्ञा ! साऱ्या माणसांतल्या देवत्वाचा हा पुकार ! जें जें महत्तम आहे त्याचा हा उत्स्फूर्त हुंकार ! संघर्षांतून, वाऱ्या वादळांतून, जय पराजयांतून, व्याधि–उपाधींतून वाचलेलें हें अमृत.

## दुरिताचें तिमिर जावो

येणारे प्रत्येक संवत्सर हा जप गात गातच मुळीं अवतरत असते. त्या सर्व संवत्सरभर जणुं ज्ञानेशांची ती शांत, स्थितप्रज्ञ मूर्ति हें पार्श्वगायनच करीत असते. आज ना उद्यां, उद्यां ना परवां कालपुरुष ह्या जपाला पावेल अशी त्या महापुरुषाची व त्याच्या मुखानें साऱ्या संतांची इच्छाच जणुं त्याला साद घालीत असते. कधीं कधीं झाडाला मोहर येतो. वेली बहरतात. जगाचें 'दुरित' संपत आलें असा आभासही उत्पन्न होतो. आणि मग अचानक कुठेंतरी असुरशक्तीचा उदय होतो. आकाशांत अग्नीचे लोळ लोटूं लागतात. किंकाळ्यांनीं नभोमंडळ भरून जातें. रक्ताच्या नद्या वाहूं लागतात. सुरशक्ति संकटांत सांपडते. माणसांतलें 'देवत्व' थरथरतें. आणि सारी सृष्टि जणुं भूकंपाची स्थिति अनुभवते.

असें वारंवार घडत आलें आहे. असेंच वारंवार घडत आलें आहे. युगामागून युगें गेलीं. ह्या पृथ्वीनें अनेक संत महंत, शूर-धीर पुरुषांना जन्म दिला. श्रीकृष्ण, व्यास-वाल्मिकी, कालीदास–भवभूति – नानक – महावीर, खिस्त–बुद्धांच्या रूपानें सुरशक्ति उभी करण्याचा प्रयत्न केला. परंतु अजूनही असुरशक्तीचा 'क्षयो' झाला नाहीं. 'अभक्तांचें' अधिराज्य अजूनही पृथ्वीवर कायम आहे. आणि म्हणूनच प्रत्येक संवत्सर तोच उद्घोष करीत अवतरते आहे.

## दुरिताचें तिमिर जावो

त्याचें तें स्वप्न कोण पूर्ण करील ? त्या वांछिला गोड फलित केव्हां लाभेल ? अभक्तांचा 'क्षयो' कधीं होईल ? सुरा-सुरांचा युगें युगें चाललेला हा संगर केव्हां समाप्त होईल ? **'उदंड जाहले पाणी, स्नान संध्या करावया'** अशी स्थिति ह्या सुरभूमीला कधीं लाभेल ? इच्छातृप्ति देणाऱ्या ह्या कल्पवृक्षाला सुफळें केव्हां लाभतील? विद्या, कला, शास्त्रें आणि एकूण मानवी जीवन ह्याला चिकटलेल्या ह्या संहारक जळवांचा विनाश केव्हां होईल ? केव्हां ?

आज तरी युगंधर एकच पालुपद गात आहे.

**जमेचि ना । बनेचि ना ! पटेचि ना । घडेचि ना (यशवंत)**

येणाऱ्या संवत्सराचे रूपानें कालपुरुष मात्र पुन्हां पुन्हां एकच सदिच्छा प्रगट करतो आहे.

## दुरिताचें तिमिर जावो

नवें संवत्सरही तीच सदिच्छा व्यक्त करीत आलें आहे. त्याचें स्वप्नही 'आनंदवन भुवना'चेंच आहे. त्यानें वाहू पसरले आहेत. त्याच्या उरीं कणव आहे. मनांत माया आहे. "परमेश्वरा, त्यांना क्षमा कर; कारण आपण काय करतो आहोंत हें त्यांना कळत नाहीं." असेंच तें मुखानें म्हणत आहे. नवीं पानें रक्तलांछित होऊं नयेत म्हणून तें सारखी साद घालते आहे. "जगा आणि जगूं द्या" अखेर हें सारें घडविणार तरी कोण ? त्या मागणीला यशस्वी साद देणार कोण ? ह्या सुर-भूमीचें 'आनंदवन भुवन' करणार कोण? ज्ञानेशांचें मुखानें स्त्रवलेले अमृत घटाघटांतून दुनियेला देणार कोण ? सद्धर्माचा जयजयकार गरजणार अखेर कुणाच्या मुखानें? असुरांचा पराभव करणार कोण ?

ह्या साऱ्या प्रश्नांचें उत्तर एकच **"आम्हीं" आम्हीं ससारे** !!!! आमच्यांतल्या "देवत्वाला" हें करावें लागेल. नियतीनें दिलेलें तें 'सत्कर्म' आहे.

**–संपादक**



अनुक्रमणिका








### "यमानें फड जिंकला"

स. न. वि. वि.

कांहीं वर्षापूर्वी तुम्हीं दिवाळी अंकाची जाहिरात . 'दीपावलीचा जाहिरातीवर विश्वास नाही' अशी करीत होता. 'दीपावली'चा १९६४ चा दिवाळीचा अंक वाचतांना 'दीपावलीचा महागाईवर विश्वास नाही' अशी जाहिरात तर तुम्हांला करायची नाहीं ना ? असा मला संशय आला कारण आत्यंतिक महागाईच्या ह्या काळांत सव्वा दोनशे 'भरीव' पानें, बहुरंगी मुखपृष्ठ, आंत सहा बहुरंगी कलाकृती, प्रत्येक गोष्टीला वा लेखाला लक्षांत राहील अशी खास सजावट, शिवाय रंगीबेरंगी चित्रमालिका हे सगळे अवघ्या तीन रुपयांत देणं म्हणजे 'मनोराज्य' करण्यासारखं आहे, पण तुम्ही तें करून दाखविलंत ! (पंक्चरून न देतां !) हें सगळं तुम्हांला कसं काय जमलं ?

अंकांतील श्री. पु. भा. भावे ह्यांची 'हिमानी' ही कथा 'विमानी' उंची गांठणारी आहे पण 'दीपावली'च्या दिवाळी अंकांत नेहमीं मानाचं पान पटकाविणारे श्री. अरविंद गोखले यंदा 'अनवाणी' कां लिहून गेले ? सगळ्या कथांत 'रागा'मध्यें पक्की आहे श्री. मा. कृ. पारधी ह्यांची 'रागिणी' ! कथा बहारीची आहे. मराठींत अशा वेगळ्या घाटणीनें लिहिलेली कथा विरळी. सौ. शिरीष पैंची 'एका संध्याकाळी' ही कथा संध्याकाळीं वाचल्या— मुळें माझी संध्याकाळ चांगली गेली पण प्रा. सदानंद रेगे ह्यांचा 'मासा' चाखून उगीच तोंड खारट झाल्यासारखें वाटलें.

विनोदी साहित्यांत श्री. वसंत सबनीस ह्यांच्या यमानें फड जिंकला असून श्री. जयवंत दळवी ह्यांची मुंबईही 'लई मजेदार' आहे.

श्री. काकासाहेब गाडगीळ ह्यांचं 'वस्त्र' भरदार आहे तर श्री. विद्याधर गोखले ह्यांचा 'रसराज' वाचून आपण बिलकुल 'नाराज' नाहीं.

तुमच्या सहाही कलाकृती फक्कड आहेत. सगळ्या चित्रांची रंगसंगतीही फक्कड आहे. त्यांतल्या त्यांत 'मोह'ची रंगसंगती जास्त मोहक आहे.

सुंदर अंक काढल्याबद्दल आपलें मन:पूर्वक अभिनंदन !

आपला,

मुलुंड — **दि. श्री. कराडकर**




### ज्वलंत प्रश्नाला चालना

स. न. वि. वि.

सालाबादप्रमाणें आपल्या 'दीपावली'च्या दिवाळी अंकाबद्दल एका वाक्यांत लिहायचे झाले तर "सध्यांच्या महागाईच्या व चण- चणीच्या दिवसांत आपण दीपावलीचा उत्कृष्ट अंक दिलात." असें लिहून मोकळे होतां येईल.

यंदा पु. ल.नीं अज्ञातवासांत कां दडी मारली ते समजत नाहीं. श्री. भाव्यांनीं आपल्या धारदार लेखणीनें दीपावलींत एका ज्वलंत प्रश्नाला चालना दिली आहे. त्यांच्या प्रभावी लेखणीनें "हिमानी"शीं त्यानें विवाह केला हे **निस्संदिग्ध** शब्दांत सांगायला पाहिजे होते. नरकचतुर्दशीच्या दिवशीं अभ्यंगस्नान करतांना हिंदुमात्रानें श्रीकृष्णाचें उदाहरण डोळ्यांपुढें ठेवून एकातरी जुलमानें भ्रष्ट केलेल्या स्त्रीचें जीवन मानानें जगण्यास तिला सहाय्य करण्याची जिद्द बाळगायला पाहिजे. जरासंधाच्या अंत:पुरांतील चारि- त्र्यहीनतेचा निष्कारण डाग लागलेल्या सोळासहस्र नारींना त्या नरपुंगवानें आपलें नांव देऊन त्यांना मानानें जगणें शक्य केले त्याचे निदान महत्व तरी आजच्या समाजानें लक्षांत बाळगावे.

श्री. दळवींचें मुंबईवर्णन बंगालींत लिहिले तर काय मजा येईल ? निदान त्याकरतां तरी बंगाली शिकायला पाहिजे ! आपण सीतात्यागाबद्दलचा लेख प्रसिद्ध करून आणखी एकदां खळबळ माजवणार हें उघड आहे. एकंदरींत सध्यांच्या टंचाईच्या दिवसांत निदान वाङ्मयसृष्टींत तरी उच्च दर्जाच्या साहित्याला वाण नाहीं हें आपण सिद्ध केलेत.

आपल्यालाही सरकारी यंत्रणेचा फटका बसलेला दिसतो नपेक्षां आपली चित्रसृष्टी नेहमींप्रमाणें योग्य पार्श्वभूमीवर (कागदावर) शोभून दिसली असती. व्यंगचित्रें परिणाम- कारक आहेत पण चित्रें मात्र तितकीशीं आकर्षक वाटत नाहींत अर्थात कागदाची दुर्मिळता हें आमचे दुर्दैव.

आपला,

कलकत्ता — **ना. दा. पालकर,**

### कंपूशाहीला छेद

स. न. वि. वि.

आपला दिवाळी अंक वाचला. दिलीप चित्रे, सौ. शिरीष पै आणि श्री. पु. भा. भावे यांच्या कथा मला आवडल्या. विशेषत: दिलीप चित्रे कविता आणि समीक्षा यांव्यतिरिक्तहि ललितलेखन करूं लागले, ही गोष्ट आनंदाची आहे. त्यांचें हें लेखन **दीपावली**नें मिळविले, ही गोष्ट; एवढेंच नव्हे तर चित्र्यांची कथा (माझ्या आठवणीप्रमाणें सात वर्षापूर्वीच्या **सत्यकथेंतील** एक अपवाद वगळतां) दीपावलीनें प्रथम व तीही दिवाळी अंकांत दिली, याबद्दल आनंद वाटला. **दीपावली** जुन्याच पूर्वसंबंधित लेखकांच्या कक्षेंत न थांबतां चांगलें लेखन करणाऱ्या नवीन लोकांनाही स्थान देते आहे, हें पाहून तरुण लेखकांना धीर येईल व त्यामुळेंच सध्यां अपरिहार्यपणें निर्माण होत असलेल्या 'कंपू'शाहीला कांहींसा आळा बसेल.

कवितांच्या छपाईबद्दल मात्र असमाधान वाटलें. पूर्वीच्या कांहीं दिवाळी अंकांत ज्या कलापूर्ण रीतीनें तुम्ही कविता सादर केल्या होत्या, ती पद्धति अजूनही आठवते. कविता एकत्र देण्याचें टाकूनही, तुम्ही त्या वेधकरीतीनें सादर केल्या होत्या.

आपला,

मुंबई. — **प्रभाकर ना. परांजपे**





अनुक्रमणिका








# साहित्य आणि संगीतांत मी अभेद मानतो-कारण दोन्हीं ठिकाणीं सूर आणि लयीला सारखेंच महत्त्व असतें–

## –पुरुषोत्तम लक्ष्मण देशपांडे

**नांदेड** येथें ह्या महिन्याचे अखेरीस भरणाऱ्या मराठी नाट्य संमेलनाचे अध्यक्षपदीं श्री. पु. ल. देशपांडे यांची अविरोध निवड झाल्याबद्दल कुणाही मराठी माणसाचें मन आनंदानें बहरून येईल. आम्हीहि दीपावलीतर्फे त्यांचें मनःपूर्वक अभिनंदन करतों. पु. ल. देशपांडे यांच्या वाङ्मयीन कर्तृत्वाबद्दलच्या मराठी मनाला वाटणाऱ्या अभिमानाची ती पावती आहे असेंच मानावें लागेल.आणि अशी पावती मराठी मनानें 'पु. ल. दे' यांना वारंवार दिली आहे. त्यांच्या नाटकांना दिली जात. त्यांच्या 'बटाटयाची चाळ ते असामी' पर्यंतच्या विविध प्रयोगांना दिली आहे. त्यांच्या वक्तृत्वाला दिली आहे. त्यांच्या संगीताला दिली जात आहे. त्यांच्या नाट्यचित्रपटांतील भूमिकांना दिली आहे. आणि त्यांच्या विनोदी लेखनाला तर भरभरून दिली आहे. मराठी माणूस हा अंतःकरणाचा रसिक माणूस आहे. आणि रसिकराजांची तृप्ति करण्याचें असामान्य कलाकसब श्री. पु. ल. देशपांडे यांच्याजवळ एकवटलं आहे. परवां कुणींतरी त्यांच्याबद्दल लिहितांना असं लिहिलं आहे कीं,"He is Jack of all and master of any" ह्या वाक्यांत जुळाऱ्याची चूक तर नाहीं ना अशी मला तें वाचतांच शंका आली. त्यांतल्या शेवटचे शब्दांत Any च्या मागें M हा शब्द यायला पाहिजे असें मला वाटतें. कांहीं माणसें नुसते 'किस्ते'च गिरवीत राहतात...पण ती अवस्था कधींतरी संपणें अपरिहार्य असते. ती संपून,

### मुलाखत–प्रभाकर अत्रे

मग त्याच्या कलेचें जें विकसित रूप प्रगट होतें तें जर स्तिमित करणारें असेल तर तिथेंच त्याचें मोठेंपण मोजायला हवें. तुझें आहे तुजपाशीं, बटाटयाची चाळ, व्यक्ति आणि वल्ली, अपूर्वाई, पूर्वरंग, माओचें लष्करी आव्हान ह्या पुस्तकाची प्रस्तावना, "गुळाचा गणपती"तलें काम व त्याला लाभलेलें संगीत, वाऱ्यावरच्या वरातीतली पेटी ह्या व ह्या सारख्या कितीतरी कलाकृतींनी देशपांडयांच्या कलेचें विकसित व प्रसन्न रूप मराठी कला रसिकांना दाखविलें आहे आणि म्हणूनच मराठी माणसांनी त्यांच्या कलेचे आम्ही चाहते आहोंत असाच हुंकार दिला आहे.

मी मुलाखतीसाठीं गेलों तेव्हां त्यांच्या अनेकविध व्यापांतूनही त्यांनीं अगदीं मोकळेपणानें गप्पा केल्या. कधीं प्रश्न बाजूलाही रहात आणि मोकळें आत्मनिवेदन सुरूं होई. कधीं प्रश्न पुढे सरकत आणि मग त्यांतले बारकावे ते समजावून सांगत. कांहीं माणसें उगीचच 'आंतल्या गांठीची' वाटतात. कांहींतरी चोरून , लपवून, राखून ठेवावें असें त्यांना वाटत राहते. देशपांडयांशीं बोलतांना त्यांनी असे कितीतरी 'कौटुंबिक' किस्से ऐकवले कीं, ज्यांच्यांतून त्यांची जडणघडण झाली आहे. ज्या पायऱ्यांवरून आपण चढून गेलो, त्या पायऱ्या विसरून जाणारे कलाकारही पुष्कळ दिसतात. पण पु. ल. देशपांडे यांनीं मात्र अगदी पहिल्या वहिल्या पायऱ्यांचेंही स्मरणपूर्वक निवेदन केलें. बोलतांना कधीं मन भरूनही येत होतं. अशा वेळीं त्यांच्या मिश्किल डोळयांत मोती चमकून जात. आपल्या आजच्या यशाच्या संदर्भात बोलतांना ते म्हणाले कीं, मी जगभर हिंडून आलों आहे.यश,फार मोठं यश म्हणजे काय तें मी पाहून आलो आहे. त्या मानानें मी फार लहान आहे. अजून खूप मजल गांठायची आहे याची मला जाणीव आहे. आणि त्यानंतर त्यांनी त्यांच्या वयाचे ९ वें वर्षी बालगंधर्वांनी त्यांची पेटी ऐकल्यानंतर दिलेल्या शाबासकीचा उल्लेख केला. "यशच म्हणायचं झालं तर त्याला मी म्हणेन" असं त्यांनी कृतज्ञतापूर्वक म्हटलं. आपल्याकडच्या यशाच्या, वैभवाच्या फूटपट्टया फार लहान, तोकडया आहेत याची जाणीव त्यांनी व्यक्त केली.

देशपांडे ह्यांच्या घरीं मला जाणवली ती शांति, तृप्ति ! कांहीं कलाकारांच्या घरीं फोटोंची झुंबड दिसते. देशपांडयांच्या घरीं असें 'प्रदर्शन' नाहीं. हॉलमध्यें उभ्या स्टँडचा एक सुंदरसा, कलापूर्ण दिवा आहे. मोजकेंच व रेखीव फर्निचर आहे. भिंतीवर कांहीं रेखीव कलाकृति आहेत. पण कुठलाही 'शो' नाहीं. मालकाचा मनमोकळेपणा त्या साऱ्या वास्तूंत जाणवतो. देशपांडयांना गप्पांइतकेंच सिगरेटचेंही वेड आहे. गप्पा मारतांना इतक्या सहजतेनें ते विनोदी बोलून जातात कीं, विनोद हा त्यांच्या व्यक्तित्वाचाच एक अविभाज्य भाग झाला आहे हें जाणवतें. बोलतांनाही मधूनच उठतील, फेऱ्या घालतील, मध्येंच सिगरेट पेटवतील. मधूनच कोट काढून ठेवतील शर्टच्या बाह्या वळवतील आणि अगदीं मोकळेपणानें खुर्चीवर मांडी घालून बसतील...हें घडतें आहे ह्याची जाणीवही होऊं न देतां हें घडून जाईल. कलावंताची अस्वस्थता, भिरभिरणारें मनच जणुं ह्या हालचालींतून प्रगट होऊन जातें.



अनुक्रमणिका






**प्रश्न** — आपण वरीच नाटकें लिहिलीत, अभिनय केला, विनोदी लेखन केले. विविध क्षेत्रांत पडलांत त्यामागें योजना होती कीं योगायोग ?

**देशपांडे** —जगांत जें घडतं, त्यांत माणसाचा वांटा किती आणि योगायोगाचा किती हें नेमकं सांगणं कठीण आहे. मी मात्र स्वतःला माझ्या आयुष्यांतल्या अनुभवांमुळें योगाला फार मानतो. महत्वाचें स्थान देतो. माझा जन्म अशा घरांत झाला कीं जें साहित्य, संगीत, नाटक ह्यांना रसिकतेनें साद देणारें होतें. माझे वडील हे स्वतः कलावंत नसले तरी फार चांगल्यापैकी रसिक होते. कळत न कळतच त्यांनी आमच्यावर जे संस्कार केले ते चांगल्या रसिकतेचे असेच होते. त्या काळांत नाटक, संगीत ह्याबद्दलच्या कल्पना फार वेगळ्या होत्या. संगीताच्या मैफलीला जाणें वा नाटकांना जाणें हें त्यावेळीं मुलांचे बाबतींच नव्हे तर मोठ्यांचे बाबतही निषिद्ध मानले जाई. पण मला मात्र गाण्याच्या बैठकीला जाण्याबाबत, नाटकें पाहाण्याबाबत वा नाटकांत कामें करण्याबाबत कधीं विरोध झाला नाहीं, उलट नेहमीं प्रोत्साहनच मिळालें. तुम्हांला उदाहरणच सांगतो. माझ्यासाठीं घरांतली माळचावरची खोली अशा वेळीं राखूनठेवली जाई. घरांतल्या कुणालाही त्रास न देतां मला रात्रीं उशिरांसुद्धां घरीं परततां येत असे. गाण्यानाटकानें पोरें बिघडतील असें कधी स्वप्नांतही माझ्या वडिलांच्यामनांत आलें नाहीं. ज्या काळांत वडिलांसमोर मुलें उभें रहायला भीत अशा काळांत वडील मला ह्यासारख्या विषयांत प्रोत्साहन देत.



[ छायाचित्र मोहन वाघ यांच्या सौजन्यानें ]

आतां दुसरा किस्सा सांगतो. त्यांनीं मला 'पेटी' दिली ! पेटीची किंमत त्यांनीं विचारली. एकशेंपन्नास रुपये किंमत होती. माझ्या वडिलांचा पगारच मुळीं एकशें पन्नास होता. पण त्यांनी मला पेटी विकत घेऊन दिली.

माझे आजोबा श्री. ऋग्वेदी हे तर चांगल्या मूल्यांचे जतन करणारे, मूल्यें मानणारे गृहस्थ होते. त्यांच्यामुळेंही कलेचें कौतुक होत असे. माझ्या वडिलांसमोर बसून मी रोज संध्याकाळीं गात असे, तर आजोबांच्यामुळें गीता पठण, वाचन, वक्तृत्व इत्यादि गोष्टींची गोडी वाढत गेली. कळत न कळतच माझी जडणघडण होत गेली. पार्ल्याला वातावरण फार चांगलें होतें. ती सर्व वर्षें जडणघडणीचीच होतीं. तिसरींत असतांना १९३१ ची चळवळ झाली. कॉलेजांत होतो. तेव्हां १९४२ ची चळवळ झाली. एका बाजूला पुढाऱ्यांचे संस्कार होत होते. आणि एकीकडे गंधर्व, बोडस ह्यांच्या कलागुणांचे संस्कार होत होते. आमचे वडील हे आम्हांला वडील असे कधीं वाटलेच नाहींत. ते आमचे मित्र होते वडील गेल्यावर आमचा घरांतला एक मित्रच गेला असें मला वाटलें. चारित्र्यसंपन्न माणूस होता. माधुकरी मागून शिकला. घरांत वातावरण साधें होतें. देशीपणाचा वारसा हा माझ्या वडलांचा व आजोबांचा वारसा आहे.

माझ्या जडणघडणींत सौ. सुनीताचा वांटाही फार मोठा आहे. त्यांच्या घराण्याचें वातावरणही सुसंस्कृत व





अनुक्रमणिका

सांस्कृतिकदृष्ट्या थोर वारसा असलेलें आहे. हा योगायोगच मानायला हवा नाहीं कां ?
आणखी एक किस्सा सांगूं ?

**मी–** सांगा!

**देशपांडे–** अहो मी होणार होतो वकील. लॉच्या परीक्षेच्या वेळीं गाणें बंद केलें. तेव्हां वडिलांनी विचारलं "कां रे बाबा गाणे बंद कां!" मी सांगितले परीक्षा आली आहे म्हणून! त्यावर ते म्हणाले "गाणें बंद करून तूं वकील होणार असशील तर नको ती वकिली. आजोळीं तर घरगुती वातावरण होतें. विद्वत्‌जनांच्या बैठकींत घरांतील आजी-सकट सारीं माणसें बसत असत. भाचीच्या पुनर्लग्नाला आजोबांनी पौरोहित्य केलें. कारकुनांच्या संघटना काढल्या पहिलें Clerk's Manual लिहिलें. रात्रीच्या शाळांत भाग घेतला. ह्या साऱ्या वातावरणांतून आजचा मी घडलो आहे.आतां हें वातावरण लाभणें हा योगायोगच कीं नाहीं!

**प्रश्न—** आपल्या भोंवतालच्या वातावरणानें आपल्याला साहित्य, संगीत, नाट्य यांचा वारसा दिला तर—

**देशपांडे–** होय! आज मी खांद्यावर तीन पताका टाकून प्रवास करतो आहे. साहित्य, संगीत आणि नाट्य ह्या त्या तीन पताका होत. त्या पताका मी कधीं खालीं ठेवीन असें मला वाटत नाहीं.

**प्रश्न–** आपण गाणें कुणाजवळ व कधीं शिकलांत ?

**देशपांडे–** मी गाणें श्रवणानें शिकलो. पेटीवादनापासून संगीताची सुरुवात केली. पण कॉलेज आणि गायन क्लास ह्यांची दुहेरी फी परवडण्यासारखी नव्हती. गवयी मात्र मी खूप ऐकले. असामान्य असे गवयी ऐकायचें भाग्य मला लाभलें. त्यांतून एक प्रकारची जिद्द तयार झाली. साहित्यिकांपेक्षां जिद्द असणारे लोक संगीतांत जास्त आहेत असें मला वाटतें. कुलाचार मानून साधना केली जाते त्या क्षेत्रांत मी तसा कुलाचार मानतो. जिद्द महत्वाची मानतो. अर्थातच गाण्याच्या बाबतींतल्या माझ्या मर्यादा मी फार लवकर ओळखल्या. आज माझी भूमिका केवळ स्वररचनाकार येवढीच राहिली आहे.

**प्रश्न–** आपण आपल्या लेखांचे विषय कसे निवडतां ? कसे मिळतात ते ?

**देशपांडे–** माणूस हाच मुळीं लेखकाच्या लेखनाचा विषय असतो. त्याचे विविध मनोव्यापार हेंच त्याचें इंधन असतें ! अर्थातच ह्या विविध प्रकृतीच्या माणसाचें चित्रण मात्र लेखकाच्या वैयक्तिक प्रकृतीनुसार होत असते. जीवनांतल्या विविध क्षेत्रांत वावरत असतांना विविध प्रकारच्या विसंगति सहज रीत्या सुद्धां ध्यानात येतात. आणि मग त्यांतून लेखनाला विषय मिळतात. त्यांतून मी त्या विसंगतींची थट्टा केली आहे. क्वचित् प्रसंगीं मर्यादातिक्रमही झाला असेल. पण त्यामागे दुष्टपणा वा दुष्टबुद्धि मात्र कधीं नव्हती व नाहीं. कुणालाही माणसांतून उठविण्याचे भूमिकेनें मी कधीं लिहिले नाहीं. माणूस म्हणून माणसांतल्या विसंगतीचें, उणिवांचे चित्रण केलें पण वैयक्तिक अहिताची भूमिका मात्र माझ्या लेखनांत नाहीं. सामान्य अहंकारांतूनही विनोदी लेखनाला प्रेरणा मिळते. चांगल्या मूल्यांची पायमल्ली झाली तर दुःख होते. वेदना जागृत होतात. त्यांतूनही कांही प्रेरणा मिळते. पण हें करतांना त्या त्या व्यक्तीविषयीं सहानुभूति असते. मागें वाङ्‌मयांतल्या एका प्रवृत्तीला उद्देशून "विश्वः अश्वः शब्दे" असा एक लेख मी लिहिला. पण मराठींतल्या एका नामवंत लेखकाला असें वाटलें कीं तो लेख मी त्यांच्यावरच लिहिला आहे. परंतु तें सत्य नव्हते. पण केवळ त्यांच्या भावनांचा अवमान होऊं नये म्हणून मी तो लेख माझ्या कोणत्याही पुस्तकांत दिला नाहीं.

**प्रश्न–** लेखनासाठीं आपल्याला एकांताची गरज भासते काय ?

**देशपांडे–** "छेः! छेः! तशी गरज मला भासत नाहीं. कलावंत हा माणसांतला असला पाहिजे. माणसांबद्दल त्याला आस्था जिव्हाळा असला पाहिजे माणसाचा वीट आला कीं तो तो 'म्हातारा चळलाच' असें गडकऱ्यांच्या भाषेंत म्हणायला पाहिजे. एकांताचें सेवन अखेर माणसांतच जाण्यासाठीं ही समर्थांची भूमिका होती. मला समर्थांबद्दल भारी वेड आहे. जमिनीला घट्ट पाय रोंवून देवाकडे पहाणारा तो माणूस आहे असें मला वाटतें ! **धन ते गायनी कला** असे तो म्हणतो. त्यांची आनंदवन भुवनाची कल्पना ही कलेची मूलभूत भूमिका आहे असें मला वाटतें.

**प्रश्न–** आपण योजनापूर्वक ( planned ) लिहितां किंवा काय !

**देशपांडे–** छे छे ! लिहिण्याचे 'शास्त्रां'त आपल्याला कांहीं गति नाहीं. सांचत जातें आणि लिहून टाकतो झालं. अनुभवांचा स्वीकार करायला त्या शास्त्राच्या नियमांची गरज आहे असें मला वाटत नाहीं. निर्मिती हा साक्षात्कारांतून येणारा भाग आहे. कलाकृतीची स्वीकृति हाही एक साक्षात्कारच ! त्याचें पृथक्करण हा एक शोध आहे. शोधक जर टीकाकार असेल तर त्याला शोधांतही आनंद मिळेल. आणि कलेच्या निर्मितीइतकाच तोही आनंद मोठा आहे. उदाहरणार्थ टायनन वा स्टॅनिस्लॉव्हस्कीचें नाट्य समीक्षणात्मक लेखन वाचतांना एखादी कथा वाचल्याइतकाच आनंद होतो.

**प्रश्न–** आपल्या विषयांच्या बाबतींत आपण कांही टांचणें, डायरी वगैरे ठेवतां कीं नाहीं ?

**देशपांडे–** टांचणें डायऱ्या वगैरे कांहीं ठेवीत नाहीं. पण प्रवासाची मात्र टांचणें ठेवली होती. ठेवतो. बारकाईनें ठेवणें अगत्याचें मानतो. प्रसंग व्यक्ति यांचा तपशील ठेवावा

( पान ६० वर पहा )











**पूर्वजांच्या शतावधि पिढ्यांनीं येथें तपश्चर्या केली. तापलेले जीव येथेंच शेवटीं आश्रयाला आले. ह्याच माहेरघरीं! संदेहाकुल मानवाच्या शंका येथेंच फिटल्या. अनेकांना ज्ञानचक्षु लाभले ते येथेंच! साक्षात्कारही घडले येथेंच!—**

**—हाच तो नगाधिराज हिमालय!!!**

पु. भा. भावे



**जीप** धांवत होती व आम्ही बोलत होतों (बोलणें आमच्या पांचवीलाच पुजले होते.) आतां दुपार झाली होती, सूर्य माथ्यावर आला होता. दुपार व सायंकाळ ह्यांत शब्दापुरतें अंतर होते, थंडीच्या प्रमाणांत फार मोठें अंतर नव्हते. भोजनोत्तर आम्ही लेहमध्यें आणखी एक फेरफटका मारला. संरक्षणविभागाच्या संशोधन शाळेंत पायधूळ झाडली. तेथें अनेक प्रयोग चालू आहेत. कडक थंडींत सोयीचे ठरतील असे कपडे बनविण्याचा प्रयोग, दीर्घकाल टिकतील असे अन्नपदार्थ बनविण्याचे प्रयोग. ह्या वायुमानांत शस्त्रास्त्रासमवेतच विशेष प्रकारच्या अन्नवस्त्रालाहि फार महत्व आहे. ही प्रयोगशाळा "त्या" डाकबंगल्याच्या जवळपासच आहे. प्रयोगशाळेच्या परिसरांत फळझाडें जोपासलीं आहेत. आवारांतून वाहणाऱ्या पाण्याच्या ओघावर जलविद्युत् निर्माण करण्याचा प्रयत्न चालू आहे. अशा प्रकारचा ह्या प्रदेशांतील हा पहिलाच प्रयत्न आहे. हिवाळ्यांत पाणी गोठल्यावर ह्या प्रयत्नाचें काय होणार हा प्रश्न आमच्याप्रमाणेंच संबंधित सज्जनांनाहि सुचलेला आहे. पण प्रश्न सुचला म्हणजे उत्तरहि सुचण्याचा संभव असतो. असेच स्वतःला व दुसऱ्यांना प्रश्न विचारीत आम्ही लेहमध्यें व आसमंतांत दीड दोन दिवस फिरलो.

मराठी माणसें तेथेंही भेटलीं. रात्रीच्या फिकट प्रकाशांतलें एक लांबुळके निवासस्थान मला आठवते. निवासस्थान पाहिल्याबरोबर सैन्याचा शिक्का मला ओळखूं आला. घर छोटें पण नीटनेटकें होते. वाटेवर आंखीव दगड लावलेले होते. झाडेंहि जोपासली होती. ह्या घरांत रानडे नांवाचे एक गृहस्थ आम्हांला भेटले. मराठी माणूस इतक्या दूर भेटल्याचा आनंद झालाच. पण ह्या रानड्यांना मराठी मात्र मुळींच बोलतां येत नव्हते. उत्तर प्रदेशांतच त्यांच्या पिढ्या गेल्या होत्या. पण अगदीं पुणेरी मराठी बोलणारीं माणसेंहि आम्हांला भेटलीं. अन्य छावण्या पाहिल्या. तेथें अन्य प्रांतांतलीं माणसें भेटलीं. शीख व पंजाबी येथेंहि उठून दिसत होते. धिप्पाड जाठ शेजारच्या पर्वतांना लाजवीत होते. पहाडासारखीं एकेक माणसें येथें पाहिली व वाटलें कीं एका दुर्दम्य हेतूनें प्रेरित झालीं तर हीं माणसें काय करणार नाहींत?

ह्या माणसांच्या कर्मभूमीकडेच दुसऱ्या दिवशीं आम्हांस जावयाचें होतें. सत्तावीसच्या सकाळीं आम्ही लेह सोडले. सामान सोडणे व सामान बांधणे हा विधी आम्हांला आतां पाठ झाला होता. विमानांत वजन जास्त होईल, ह्या भयानें सामान जास्त आणलें नव्हते. एरवीं थर्मास, पाणपिशवी, पाणकोट, सुरी, साबण, उशा, बशा ह्यासारखा सगळा सरंजाम मी जवळ बाळगतो. सामान बांधणारे घरांतलें उत्तमांग "वर्नाल" सारखीं औषधें बरोबर घ्यावयास देखील चुकत नाहीं. देशपांडेयांच्या सामानांत नीटसपणें बांधलेली हिरव्या पाणकोटाची घडी होती, व प्लास्टिक कागदांत गुंडाळलेली धुण्याच्या साबणाची वडीहि होती. मला वाटतें ह्या प्रवासांत आमच्यापैकीं प्रत्येकाला मनांतल्या मनांत तरी आपल्या बायकोची आठवण होत होती. देशपांडे तर स्वच्छ म्हणालेच कीं 'प्रवासांत बायको बरोबर असली कीं मला कांहीं पहावें लागत नाहीं. विमानांतल्या जागा राखून ठेवण्यापासून सारीं कामें ती करते. कुठें कसली चूक म्हणून ती करीत नाहीं.

ह्या प्रवासांत मात्र आम्हीच एकमेकांचे त्राते व पालनकर्ते होतो. जमेल तसें स्वतःचे व दुसऱ्याचे बाडबिस्तार गुंडाळून व कामापुरती पोटपूजा करून आम्ही ले. कर्नल मैत्रांच्या स्वाधीन झालो. आमच्या दिमतीस दोन वाहनें होती. एकांत सामान व सारथी, दुसऱ्यांत आम्ही व सारथी. कठीणांतला कठीण मार्ग आला म्हणजे आमचें सारथ्य स्वतः मैत्र महाशय करीत.

सामान्यतः ह्या साऱ्या प्रवासांत








त्यांनींच आमचें सारथ्य केलें. तासचे तास ते चाक घरून बसलेले असत. आणि तेंहि साघ्यासुघ्या वाटेनें नव्हे. आजची ही वाट साघी नव्हती. डोंगरामागून डोंगर, पर्वतामागून पर्वत आम्हीं चढत होतो. डोंगरांच्या वर्तुळाकार जिन्यानें आम्हीं जणुं थेट आकाशाच्या अंतिम मनोऱ्यापर्यंत जाणार होतो. एका डोंगराच्या कुशींतून वळसे घेत जावे, व अधिक उंचीच्या डोंगरकुशींत शिरावे. एका अंगाला शेषाच्या टाळूपर्यंत जाणारी खोलच खोल दरी. दुसऱ्या अंगाला आकाश पोखरीत गेलेले उंचच उंच डोंगर. सार डोंगर बोडखे. सारे शुभ्र बर्फानें आच्छादलेले. वाटेच्या कडेनेंहि बर्फ पसरलें होते. धूळ व बर्फ एक होऊन गेली होती. मधेंच दुसऱ्या एखाद्या वाहनाचें घोंगावणें ऐकूं येई. वळणावरच त्यांची गांठ पडे, शिंगाचा ध्वनि घुमत राही. वाहनांनीं परस्परांना सुखरूप ओलांडावें, म्हणून मधुन मधून सवड ठेवलेली होती. वळणेंहि अशीं मुडपलेलीं होतीं कीं, तीं पाहतां पाहतां श्वास थांबावा व जीव दुमडून जावा. थोडीहि चूक झाली कीं, इहलोकींचा प्रवास समाप्त. ही चूक होऊं नये, म्हणून खडकावर जागोजाग सूचना रंगवून ठेवल्या होत्या.

"क्षणाची पेंग आणि अनंतकालची निद्रा" अशासारखीं पेंगणाऱ्या सारथ्याला चेतावणी देणारीं तीं वाक्यें होती. त्यांतील कांहीं वाक्यें इतकीं वाचनीय होतीं कीं, ती वाचण्याच्या मोहापायींच अपघात व्हावा. ह्या मार्गाच्या प्रवेशद्वारावरच मुळीं एक उत्तम वाक्य मी वाचले. "You are about to enter the highest skyway in the world." जगांतील सर्वांतउंच अशा आकाशमार्गावर प्रवेश करण्याच्याआतां तुम्हीं बेतांत आहांत. असें कांहींतरीतें वाक्य होते. त्यांतील Highway (राजमार्ग) चें Skyway (आकाशमार्ग) करणाऱ्या माणसाच्या काव्यात्म कल्पकतेचें आम्हां साऱ्यांनाच कौतुक वाटले.

हा 'आकाशमार्ग' होता खराच. पृथ्वीवरून नव्हे, जणुं आकाशांतूनच आमचा रथ धांवत होता. सारखा आकाशांत तो अधिकाधिक उंच चढत होता. आणि त्या उंच आकाशांत पांढऱ्या पिसांचे प्रचंड पर्वत आमच्या भोंवतीं गिरक्या घेत होते. आम्हांला वर आणणारी वाट पायऱ्यापायऱ्यांनीं खालीं खोलच खोल जातांना दिसत होती. आणि आमचा रथ खोकत, गुरगुरत आणि धापा टाकत अद्याप वर चढत होता. एकेक उग्र आणि उंच पर्वत आमच्याकडे डोकावून डोकावून पहात होता व मागें सरत होता. प्रत्येक पर्वताला वेगळा चेहरा आहे असें वाटत होते. प्रत्येक पर्वत जिवंत आहे असें वाटत होते. असें वाटत होते कीं, आपल्या मेघगर्जनेसारख्या गंभीर स्वरांत हा पर्वत आमच्याशीं बोलेल. तो दगडामातीचा पर्वत वाटतच नव्हता. ती चैतन्याची एक विराट ज्योत वाटत होती. आणि अशा ह्या शुभ्र तेजाच्या पर्वतज्योती आमच्याभोंवतीं असंख्य पसरल्या होत्या.

वाहन थांबले होते. पर्वताच्या खांद्यावरच आम्ही उभें होतो. स्मिमित होऊन आम्ही त्या पर्वताचा चेहरा न्याहाळत होतो. सभोवार पसरलेल्या पर्वतांचे चेहरेच चेहरे आम्हांला दिसत होते. तें विराट दृश्य पाहून दम कोंडत होता. आणि तरीहि वाटत होतें कीं, ह्या पर्वताचें आणि आमचे कांहीं स्नेहाचें नातें आहे. ज्या द्रव्याचे ते बनले आहेत त्याच द्रव्याचे आम्हीहि बनलो आहोंत. आधुनिक शास्त्रज्ञ सांगतात कीं, विश्वांत जड असें कांहींच नाहीं. आहे तें केवळ चैतन्य, तर मग चैतन्याच्या त्या समान नात्यानें आम्हीं बांधलेले होतों. जी चेतना त्यांचे ठायीं होती, तीच आमचेहि ठायीं स्फुरत होती. आणि त्यांचा जो विधाता होता तोच आमचाहि विधाता होता. क्षणार्धांत ईश्वरी सामर्थ्याचा साक्षात्कार घडविणारें तें दृश्य होतें. जडांतली जडबुद्धीहि तेथें हलली असती व अंतर्मुख झाली असती. आम्ही तर संवेदनेचे थोडेंबहुत देणें लाभलेले लेखक होतो. ती जागा सोडूंच नये असें आम्हांस वाटत होते. त्या भव्य सौंदर्यानें आम्हांस भूल दिली होती. मोहित करून सोडले होते. आम्हीं फिरफिरून पहात होतो. मधूनच बोलत होतो. चालत होतो. हिमाच्या कातणी-घरांत लपेटलेल्या दगडगोट्यांना स्पर्श करीत होतो. साखरेसारखें हिम ओंजळींत गोळा करीत होतो. पण ती जागा सोडण्याची बुद्धी आम्हांला होत नव्हती. पांडव अंतीं ह्या दिशेनें कां आले त्याचा कांहीं बोध होत होता व आपणही ह्या शुभ्र सृष्टींत स्थिर होऊन बसावें असें वाटत होतें.

तोच ले. कर्नल मैत्र आम्हांला म्हणाले, "आतां इथून हलायला पाहिजे. जास्त वेळ थांबला तर बेशुद्ध पडाल !"

"बेशुद्ध पडूं ?" आम्ही विचारलें.

"होय. ही चांगली खिड आहे. हा जगांतील अत्युच्च विकीला मार्ग. ह्या जागेची उंची सतरा सहस्र फुटांपेक्षां अधिक आहे. इतक्या विरळ वायुमानांत नवशिक्या माणसांनीं जास्त वेळ थांबणें बरें नव्हे."

आणि मग आमचीं वाहनें सापासारख्या नागमोडी वाटेनें पुन्हां सरकूं लागली. पुढच्या सुल्तुक छावणीवर आम्हांला भोजना-साठीं थोडा वेळ थांबायचें होते. हें ठाणें म्हणे खालीं होते. खालीं म्हणजे कितीसें खालीं ? तर तीनचार सहस्र फूट खालीं. इथलीं सगळीं मापेंच वेगळीं होती. साडेसतरा सहस्र फुटांवर आधींच आम्ही जाऊन आलो होतो. म्हणजे सह्याद्रीच्या सर्वोच्च कळसूबाई शिखरापेक्षां ही जागा चौपटीपेक्षां अधिक उंच होती. सपाटीवरचें श्रीनगरच मुळीं पांच सहस्र फूट उंच होते. म्हणजे कळसूबाई-पेक्षां तेंहि अधिक उंच होते. महाबळेश्वर माथेरानपेक्षां उंच होतें, हें सांगायला नको. लेह अकरा सहस्र फूट उंचीवर होते. तेथेंच मुळीं आम्हांला धाप लागली होती. तेव्हां "चांगला"ला अधिक वेळ थांबलो असतो तर आम्ही सरळ स्वर्गाला जाणें अशक्य नव्हते. पांडव असेच एकेक करून स्वर्गाला गेले. हाच तो स्वर्गमार्ग. मोक्षसाधनेचा मार्ग, मोक्षाला नेणारा मार्ग. हाच तो धर्ममार्ग.

पूर्वजांच्या शतावधि पिढ्यांनीं येथें तपश्चर्या केली. तापलेले जीव येथेंच शेवटीं आश्रयाला आले, ह्याच माहेरघरीं. संदेहाकुल मानवाच्या शंका येथें फिटल्या. अनेकांना ज्ञानचक्षु लाभले ते येथेंच, साक्षात्कारहि येथेंच घडले. उग्र तपें येथें आचरिलीं गेलीं त्या तपाच्या पावन तेजानें सारा भारतवर्ष उजळून निघाला. त्या तपोगंगेनें भारतीय भूमि फुलाफळास आणली. हाच तो नगाधि-राज. हाच तो हिमालय, ज्याची छत्रछाया आमच्या मातेच्या मस्तकीवर विराजत आहे व आमच्याहि रक्षणासाठीं व प्रेरणेसाठीं जो उभा आहे.

आम्हीं अंतर्मुख होतो व बोलत होतो. "इतकें बोलूं नका, थकाल." अशी सूचना

( पान ६४ वर पहा )




आपल्यालाहि प्रचीति येईल कीं

# टाटा-फिन्ले
## चहा
*अप्रतिम चहा आहे!*

### ताजा चहा
टाटा-फिन्ले चहा खास पॅकबंद पुड्यांतून व डब्यांतून मिळत असल्यानें ती नेहमींच ताजा असतो.

### स्वादिष्ट चहा
टाटा-फिन्ले चहांत अगदीं निवडक अशीच पत्ती वापरली असल्यानें आपल्यास नेहमीं स्वादिष्ट सुवासयुक्त चहा मिळतो.

### उत्तम चहा
टाटा-फिन्ले चहा काळजीपूर्वक मिश्रित केलेला असतो. त्यामुळें आपल्याला नेहमीं कडक व उत्तम चहा मिळतो.

**टाटा-फिनले** चहा प्या,
चहाचा खरा आस्वाद घ्या!



आपल्या निवडीकरितां पांच
उत्तम मिश्रणें
प्रेस्टिज दार्जिलिंग
ललित लीफ चहा
मिलाप लीफ चहा
बहादूर डस्ट चहा
शान डस्ट चहा




BI-TFN-9 MAR





अनुक्रमणिका

"खुनाला वाचा फुटते"
म्हणतात ना,
ती अशी—



—श्रीराम कामत

**खटल्याला** तशी गर्दी नव्हती. लॉचीं कांहीं शिकाऊ पोरं, वृत्तपत्रांचे चार-दोन वातमीदार, आणि कामानिमित्त कोर्टांत आलेली आणि तें होईपर्यंत वेळ घालवण्यासाठीं ह्या वाजूला वळलेले थोडे लोक सोडले तर कोर्टरूम एरव्हीं मोकळंच होतं.

रस्त्यागणिक ह्या मुंबईंत एखादी झोपडपट्टी आहेच म्हणतात. इथं वरेच प्रकार चालत असतात असा एक समज.

असाच एक प्रकार.

एका नांवाजलेल्या हाऊसिंग कॉलनीच्या उकीरडयावर वसलेल्या निनांवी झोपडपट्टींत घडलेला. वर्तमानपत्रांत आलं होतं, हें असं—अव्वा नांवाची एक तरुण वाई झोपडपट्टींत मृतावस्थेंत आढळली असून तिचा नवरा सव्वा फरारी आहे. हा खून त्यानंच केला असावा असा पोलिसांचा समज आहे. वहिमीचा तपास चालू आहे....

कसा का असेना ? पण पोलिसांचा तपास खरोखरच चालला होता. चांगला दोन वर्षं ! आणि कांहीं का असेना ? निदान ह्या केसमध्येंतरी वहिमी माणसाला त्यांनी धरलं होतं. साक्षीपुरावा गोळा करून केस कोर्टापुढें आणली होती. तीच आज सुनावणीला उभी होती. लोकांनीं खास गर्दी करावी असं खटल्यांत कांहीं नव्हतं.

अव्वा बिचारी मरून गेली होती. सव्वा आरोपीच्या पिंजऱ्यांत उभा होता.



त्याला गुन्हा साफ नाकबूल होता. तसा त्यानं स्वच्छ जबाब दिला होता. वकिलानं ह्याला बरोबर पढवला होता. हा म्हणत होता कीं सव्वा त्याचं नांवच नव्हतं. ह्या अव्वाला तो ओळखत नव्हता. पोलिसांनीं त्याला नाहक अटक केली होती. तो बिल्कुल बेगुनाह होता, बेकसूर होता.

आणि पोलिसांनी उभे केलेले साक्षीदार एक एक शपथेवर सांगत होते कीं हाच तो. नांव कांहीं असेल! ह्या लोकांत नांवाला महत्व नाहींतरी नसतंच. विशेष म्हणजे खुद्द स्वतःच्या छोकऱ्यालासुद्धां आपली ओळख पटूं नये म्हणून त्यानं दाढी वाढवली होती. तरी दोन तीन साक्षीदारांनी या गोष्टीचा आवर्जून उल्लेख केला होता. काय असेल तें असो आरोपीची दाढी त्यांना पसंत नव्हती. दाढीवाल्या इसमाकडे पोलिसचे लोक संशयानं पहातात असा ह्यांचा अनुभव होता

अनुक्रमणिका

तेव्हां हे आरोपीला सल्ला देत–'दाढी छाट बावा!' तो चिडून जाब करी—'दुसरं कांहीं सांगा! पण दाढी राहूं द्या! बच्च्याला ओळख पटेल–'

आरोपीचं पूर्वचारित्र्य माहीत असणारा साक्षीदार पोलिसांना सांपडलाच नव्हता. गरजहि नव्हती. ह्याचं सातआठ वर्षांचं पोरगं त्यांच्या हातीं लागलं होतं. आणि मग अधिक तपास करण्याचं बिल्कुल कारण उरलं नव्हतं. ह्या पोऱ्याकडून कोर्टासमोर त्याच्या बापाची ओळख पटवून दिली कीं गुन्हा सरळ शाबीत होत होता.

आणि सरकारी वकिलानं हेंच केलं. आरोपीच्या छोकऱ्याला साक्षीसाठीं कोर्टापुढं हजर करण्याविषयीं त्यानं पोलिसांना आदेश दिला.

आठ वर्षांचं पोर. काटकुळं, काळगेलं. अंगांत एक मळकं गंजीफ्राक. खालीं चड्डी, ढोपरावर घसरलेली. दोन्हीं लक्तरं झालेलीं, तितकीच त्याची लाज होती. तीसुद्धां त्याची नव्हती. दया येऊन कोणीतरी नागड्या फिरणाऱ्या ह्या पोराच्या अंगावर या वस्तु टाकल्या होत्या. कदाचित् त्यानंहि चोरल्या असतील! कारण दुनियेंत चोरल्या मारल्याशिवाय कांहीं मिळत नाहीं हा एकच अनुभव कळूं लागल्यापासून त्याला येत होता. आणि वयाच्या मानानं ह्या छोकऱ्याला खूप लौकर कळूं लागलं होतं. म्हणून तर जिवंत होता. त्याच्या आटल्या डोळ्यांत भूक होती–सगळीच, सगळ्याची. नजर कावळ्याची–भुरटी, करंटी. चेहरा निगरगट्ट. हातभट्टीच्या दारूसारखा.

पोलिसांनी ह्याला पुढं ढकलला. साक्षीदाराच्या पिंजऱ्यांत चढवला.

छोकऱ्याला आपला धर्म ठाऊक नव्हता. (निधर्मीयांना हिंदुधर्मांत स्थान आहेच. आणि भगवद्गीतेंत तर सर्व धर्मांच्या तत्त्वांचं सार आहे) तेव्हां गीतेवर हात ठेवून त्याला शपथ घ्यावी लागली. "ईश्वरसाक्ष खलं बोलेन. खोटं बोलणार नाहीं." आतां हा ईश्वर कोण हें पोराला ठाऊक नव्हतं. खरंच बोलायचं असलं तर ईश्वरालाच कां साक्षी ठेवायचं हेंसुद्धां त्याला कळत नव्हतं. आणि खोटं म्हणजे तरी काय त्याला पत्ता नव्हता. कोणीतरी दरडावून म्हटलं, शपथ घे. ह्यानं घेतली. आणि सशासारखं भित्र्या नजरेनं हळूंच समोर पाहिलं. कान फटकारून. वाकड्या मानेनं. ह्याच्या ओळखीचं कोणीचं नव्हतं. हीं सगळीं एकदम वेगळींच माणसं होतीं. घरांत रहाणारीं, गाद्यांवर झोंपणारीं, अख्खं अंग झांकील असे कपडे करणारीं आणि पोटभर मस्त खाणारीं.

त्यांतल्या त्यांत ओळखीचा एकच माणूस ह्याला इथं दिसत होता. काळ्या डगल्यांत रुबाबांत उभा असलेला तो टकल्या. हा माणूस खूप मोठ्यानं बोलतो. आणि नसते एक एक प्रश्न विचारतो. पण एक आहे–चुकलं तरी चिडत नाहीं, चपराकसुद्धां मारीत नाहीं. डोकं खाजवीत आपला बघत राहातो. आणि असं बोलूं नये, असं बोलावं म्हणून नीट समजून सांगतो. साल्या निळ्या डगल्यांतील माणसांसारखा हा खोटा नाहीं, छळवादी नाहीं.

"छोकरा तुझं नांव काय?" काळ्या डगल्यांतील ह्या टकल्यानंच जवळ येऊन खालीं कठड्यावर हात ठेवीत हंसत विचारलं.

"बट्या–" छोकऱ्यानं नांव सांगितलं. रस्त्याच्या कडेला चालणाऱ्या खेळांत जादूगाराला त्याच्याबरोबरचं पोरगं जाब करतं तसं.

पण काळा डगला अधिकच लाडांत आला. साल्या त्या जादूगारासारखा. गर्दीच्या टाळ्या घेण्यासाठीं तो जसा नसते फाजील प्रश्न करतो–तसाच, बिल्कुल तसाच प्रश्न करूं लागला. कोणाला खुश करीत होता–बट्याला कळेना! कारण इथं गर्दीच नव्हती. आणि जीं कांहीं चार माणसें होतीं तीं जादूचे खेळ बघणारीं नव्हतीं. पिक्चरवाली, मॅचवाली मंडळी दिसत होती.

"बट्या, तुझ्या वडलांचं नांव काय रे?" चढ्या आवाजांत काळ्या डगल्यानं सवाल केला.

"वडल?" बट्यानं स्वतःलाच प्रश्न केला. गोंधळून, हात चोळीत.

"बापाचं, तुझ्या आईच्या नवऱ्याचं?" सरकारी वकील मास्तरासारखा अर्थ सांगूं लागला.

बट्याच्या चेहऱ्यावर आणि वर डोक्यांतसुद्धां गोंधळ वाढला. हा कोण तो वडल, बाप, त्याच्या आईचा नवरा त्याला मालूमच नव्हता. सचमुच ठाऊक नव्हता!

त्यानं हेंच सांगितलं, "साहेब मालूम नाहीं! आय् शप्पथ!"

बाजूला काळ्या डगल्यांतला आणखी एक माणूस मोठ्यानं हंसला. विनाकारण, खवटपणं. ह्याचं डोचकं साफ सफेद पिकलं होतं. डोळ्यांना चष्मा होता काळ्या जाड काड्यांचा. आवाजसुद्धां घोगरा, भसाडा होता. अंगांत देव आला कीं बट्याचा बुढ्ढादेखील असाच घुमायचा. "हाः हाः! बरोबर आहे! पोराला बाप ठाऊकच नसेल. आणि त्याच्या आईला तरी ओळखतां येईल कीं नाहीं देव जाणे!"

तिकडे दुर्लक्ष करीत सरकारी वकिलानं विचारलं, "अच्छा बेटा, मला सांग–नीट आठवून सांग हं! नाहींतर उगाच हीं माणसें तुला हंसतील. तुझ्या घरांत–"

"साहेब, मला घर नाहीं हो! सच्!" बट्यानं मध्येंच म्हटलं.

"आज नसेल! पण कधींतरी"

"छाः!" बट्यानं जोरानं नकारार्थी मान हलवली. "झोपडींत ऱ्हायचों आमी!"

"बरं बेटा झोपडींत! पण आठवतं कारे, ह्या झोपडींत एक पुरुष होता–मर्द...माझ्यासारखा?"

"छाः साहेब! तुम जैसा कोनबी नव्हतं! व्हता एक बुढ्ढा–"

"बुढ्ढा कोण?"

बट्याला अजब झालं, "बुढ्ढा मालूम नाय? सगळ्यांना मालूम हा. एकदम अच्छा आदमी! कोनालाच डरत नव्हता असा शेर! डावा पाय मोडला होता आन पोटावर चार वार व्हते, चक्क सुऱ्याचे. मरणारच व्हता तेवां. पण बचला. आन् म्हनून ऐट मारी. म्हणे, मरणेकू जन्म नाय लियारे. मरतू साला नामर्द! तशी



## पालखी

दिशाहीन श्वासांसवे पावलांची
सुनी पालखी जात वेशीपुढें
तमांतून येती तुझ्या आर्त हांका
विजेची निळी वाट घाली सडे

फुलांचा टिळा देह गुंफुन फेकी
सुगंधासवे तांदळांच्या कण्या
हळू पावलांची गळे रांग दुःखी
चितेतून माझे हसूं पाहण्या

तुझी हांक कापीत येता नभाला
तसा पालखीला पुन्हा वेग आला
घरांतील पुष्पें कशीं कोमलेली
कळ्या रांगू दे तूं तुझ्या सावलीला

सख्यासोयऱ्यांच्या दिशाहीन वाटा
उदासीनल्या चुंबिता पावले
तमाच्या कुशीची मला ओढ वेडी
तुझी हांक रक्तांत तोडी फुलें.

— केशव मेश्राम

आवा वुढ्ढ्याला म्हणे, हाय मालूम ! किती तफा सांगशील वुढ्ढ्या ? तर ह्यानं घुस्सा करावा. हातांतली काठी घेऊन आवाच्या अंगावर धांवून जावं. वरडावं, लवंडी साली ! ठैर तुला काटतो मुरगीकशी. आवा ह्याला नाय भेयाची. खुशाल म्होरं व्हायची. दोन्ही हात कमरेवर घेऊन न्हायची उभी तशीच वुढ्ढ्याकडे टेचांत वघत. उलटून वरडायची, मला काटणार ? एक नाय, दोन वा पायजेत ह्या कामाला ? हाय रे कोन दुसरा ? जा देख–आन् तसा वुढ्ढा हाः हाः करून हंसत सुटे. त्याचं प्वाट लई मोटं न्हतं वगा साहेव ! तुमच्याहूनबी. आन् असा हंसूं लागला का मोटारीच्या टायरीगत हें फाक्‌फाक् फुगायचं. आवा ह्या प्वाटावरच हात मारायची. डवाडब् आपून जोरसे हंसायची, बोंबलायची, हें प्वाट फुटल हां वुढ्ढा ! जादा नग हंसूं ! आन् देख मुर्गी तूं लाव. काटीन मी. लई दिसांत नाय खाया–व्हय, व्हय गो माज्या वायो, असा वकवा करीत वुढ्ढा खोप्टाभायर धांव मारी. पाय वढत, डोचक्याला टुवाल गुंडाळीत. आन् कवावी वापस येई. कधीं जलदी, कधीं पार सांजला. आवा ह्याची राह देखत वशे. काळजी करी देर लागला तर. पुनापुना माज्या अंगावर वरडे, जा देख वुढ्ढा दिसतो तर. मला मालूम वुढ्ढ्याला सोदाया नग. तो वापस येणारच. व्हय! आन् हा यायचाच–सचमुच ! चुपचाप, पाऊलाचावी आवाज नाय होऊं द्यायचा. ह्या वक्ताला लई हटकलं–तरी जाव नाय करायचा. डोईचा टुवाल हातांत आन् ह्यांत वांधून आणी मुर्गी–एक, दोनसुद्धां एकाद् टायम वाटलीवी! आवा खुष व्हायची, फिरवी खोटगा रागानं ही वोले, वुढ्ढ्या ही वुरी आदत टाक ! मरशील एक दिन. वुढ्ढा खोल आवाजांत पारव्यासारखा घुमत म्हणे, वेटी, मरतू नालायक ! जो भल्यावुऱ्याचा नसता आणि नुसताच इचार करतू तो. मी नाय, साला तुजा तो सर्व्या मरल ! आवा वरडे, अर व्हय ! त्याचं नाम कायकू काढतू रे ? वुढ्ढा डोचक्याच्या पिकल्या केसांत उवा रांपीत जाव करी, वेटी, वात सांगितली. आन दोघंवी मग मुर्गी पिसाडायला वसत. मी आपला जीभ लांववून लाळ घोटत कोपऱ्यावर ड्वाळा ठेवून वसायचों...."

पोरगं सांगत होतं खूप अवसानांत येऊन. अडगळींत पडलेल्या चिजा भराभर उस्कटून मांडून वट्या आठवणीच्या भिजल्या नजरेनं त्या पसाऱ्यांत आपलं हरवलेलं सुख, गमावलेलं श्रेय, धुंडत होता.

आरोपीच्या वकिलाला मात्र हें सगळं चऱ्हाट वाटत होतं. पिकल्या केसांच्या ह्या काळ्या डगल्याला खटल्याच्या दृष्टीनं वट्याचं निवेदन निरुपयोगी वाटत होतं. विल्कुल निरर्थक, ताडकन् तो उठला. खांदे उडवीत उसळला, "मीलॉर्ड हें काय चालल आहे. मलातरी कळत नाहीं. फुकट कोर्टाचा वेळ चाललाय् ! तरी कोर्टाला विनंती आहे कीं छोकऱ्याला फक्त मुद्याचेच प्रश्न विचारण्यांत यावेत."

"मीलॉर्ड !" सरकारी वकील त्वेषानें ओरडला, "साक्षीदाराचं वय लक्षांत घेतां त्याच्या साक्षींत थोडाफार पाल्हाळ झाला तरी कोर्टानं याचा थोडा सहानुभूतीनं विचार करावा. छोकरा लहान आहे. काय वोलावं, किती वोलावं वगैरे गोष्टी त्याला कळत नाहींत."

"पढवायच्या होत्या मग–"आरोपीचा वकील वोलला. "ताव्यांतच तर होता !"

"सरकारला फड जिंकायचा नाहीय् ! सत्य उजेडांत आणायचं आहे." टकल्यानं उत्तर दिलं.

मॅजिस्ट्रेट हंसून वोलले, "ऑल राईट ! गो ऑन ! आय् ॲम इन्टरेस्टेड इन धीस वॉयज् लाईफ–वेगळं आहे, विशेष आहे."

तसा मग सरकारी वकिलाला अधिकच जोर चढला. हंसत, एक डोळा उडवीत त्यानं समोर वट्याकडे पाहिलं. गाल चोळत प्रश्न केला, "काय सांगत होतास तूं...मुर्गीच्या कोमऱ्यावर तुझा डोळा असायचा नाहीं का ? छान...पण काय रे हा सर्व्या का कोण..."

"मुर्गी लई तिखट लागते साहेव !" वट्यानं माहिती दिली, "नायवा, मी नाय कवी खाल्ली. खायचा वुढ्ढा हायहुय् करीत. आन् आवा. दोघंच आटवत. मला देत चघळायला एखादी तंगडी–वास फिर हें समदं आटपावं लागत होतं सर्व्या घरांत शिरण्याआदीं. कारण सर्व्याला असलं कायवी चालत नव्हतं, सोसतच नव्हतं. इटोवाचा आदमी हा. गळयांत माळ व्हती कीं. आन् वर्साला दोन खेपा वंधा इटोवाकडे पंडरीला..."

सरकारी वकिलानं पोराला मध्येंच अडवलं, "सर्व्यासुद्धां घरचाच का रे?"

"तर–तर ?" वट्यानं उलटं छेडलं, "अहो, तोवी घरचाच ! आवाचा मर्द न्हवं ?"....










"घेटा मग हें आधीं नहीं बोलायचं?"

"मोफत सांगूं, पुसल्यावगैर?" बटचानंच सरकारी वकिलाला उलट प्रश्न केला.

"वरं आतां ह्या तुझ्या सर्व्याची वात..." टकल्यानं हंसत म्हटलं.

"बोलूंच नका साहेब. चीड येते मला, घुस्सा येतो त्याचं नाम काडलं तरी. आवालावी येई. आन् वुढ्ढयालासुद्धां. हा व्हताच असा. दुनियेला वरा. घरांत आमाला फक्त वायट. आला रऽ आला का एकदम समद्यांची थोबाडं बंद व्हत. सर्व्याची नजर माज्यावरच खूप. मी कुटं व्हतों आन् काय काय केलं? खातूं कसा आन् बोलतूं काय? असल्या फालतू बावतींतसुद्धां ह्यानं फुकट कटकट करावी. सुकानं काय गिळूं देऊं नये. खेळूं देऊं नये असा लई जाच करी. बरोबरच्या प्वारांत खेळतांना दिसलों का मानेला धरून वढीत नेई हा खोपटांत आन् जाम मारी. मुन्शीपाल्टीच्या कचऱ्याच्या पेटींत घाणीचे ढीग उकरीत पावांचा तुकडा, भिस्कुट, लाडू असलं कायवाय खायला मिळतं का स्हणून बघत असलों तर हा नेमका पिछाडीला उबा ऱ्हाई. टेळत आन् मग हाताला काय लागेल तें उचलून बडवीत सुटे. मी बोंब मारायचो! तशी मग आवा वरडत भायर यायची. सर्व्याच्या हातनं मग वडून घ्यायला धावायची. तर हा आवा वरवी उखडायचा. तिलाच दम द्यायचा. आवा नाय ऐकून घ्यायची. गळा काडून ऱ्हायची. खा-खा प्वाराला सर्व्या मग सुटलास! कुत्रा कसा वसवसून म्हणे, आन् मरेना तें ह्या अशा जिण्यापरीस खूप वरं! मी साळंत जावं, लिखाया-पडाया सिकावं, समोर कालनींत ऱ्हाणाऱ्या प्वारांसारखं यवस्थित बोलावं अशी त्याची विच्छा. मला तो मोठा करणार व्हता. हापिसांत कामाला लावणार व्हता. ह्या घाणींत, गटारांत किड्यासारखा बुडूं देणार नव्हता. सर्व्या आवाला रोज हेंच सांगून ऱ्हाई आन् ती वरडायची, तुम हायस एक बडा, लई झालं! बच्चा ऱ्हाऊं दे असाच. तसा सर्व्या उलटायचा, हात उगारून म्होरं व्हायचा. आन् तवां बुढ्ढा मध्यें पडायचा. हा वरडायचा. सर्व्याला, हात् भाड्या, अर हा इचार आदी करायचा व्हतास. जवां गोंडा हलवीत हिच्यामागं ह्या खोपटांत शिरलास तवां जायचं व्हतं बाजूच्या कालनींत त्या बायकांमागं. निजायचं व्हतंस तकडच. भांचोद, तवां टाळकं फिरलं. इचार नाय ऱ्हायला. गटारच बरा वाटला—काय? कायबी असेल, सर्व्या मग थंड यायचा. तेल जळून गेलेल्या डबड्यासारखा. फक्त डबड्यांत वात जळे ह्याच्या. मान खालीं घालून जड त्वांडानं हा भायर खाटीवर जाऊन बशे. आन् मग बारीक नळी काडायचा. भोकं असत तिला. तोंडाला लावून तीच फुंकत बसायचा. साहेब, आतां मात्र सर्व्या नेहमीचा नाय ऱ्हायचा. कोणी येगळाच व्हई. बिल्कुल निराळा! ह्या नळींतून असा एक एक सूर काढायचा—ऐकत ऱ्हावं. समद्याचा इसर पडावा—भूक ऱ्हाऊं नये, नीज येऊ नये. रडूं येई फक्त—वाटे रडत रहावं, आवाच्या मांडीवर डोकं टेकून. लई बरं वाटे. जिवाला सुख लागे. आन् झूट नाय, सच सांगतूं, आवाची जानबी वढ घेई. ड्वळ्यांतून टिपं गाळत ती मला थोपटीत बशे. आन् हें देखून बुढ्ढाबी खालीवर होई. सोताशींच बडवडत ऱ्हाई, "भडव्याची ही नळी एक दिन चुलींत टाकतूं, मग वाजीव म्हणावं वाजीव. बघतूं काय वाजीवतूस?....."

आठवण ताजी झाली. आणि बटचाच्या घशांत आंवढा घोटाळला. त्याला ठसका लागला.

सरकारी वकिलानं हीच संधि साधली. उलट पक्षाच्या वकिलाकडे विजयी मुद्रेनं बघत त्यानं बटचाला विचारलं, "छोकरा, मग हा तुजा सर्व्या रात्रींचा आवाशीं भांडणं करायचा कायरे? ह्यांच्यांत वाचावाची, मारामारी?"

"नाय, बिल्कुल नाय!"

"तूं झोपलेला. तुला कसं कळणार?" टकल्यानें प्रश्न केला.

"व्हय् सच्! निजेतबी जाग यायची न्हवं? आवाच्या कुशीला निजायचों मी साहेब—" बटचानं डोकं खाजवीत सांगितलं. अन् मग बोलतां बोलतां तो अडखळला, चाचरला. सांगूं कां नको असं त्याला झालं.

"आणि सर्व्या?" सरकारी वकिलानं नसता प्रश्न केला.

वयानं पोरगं तसं लहानच. पण ह्या गोष्टी त्याला ठाऊक होत्या. आणि त्या उघड कुठं बोलायच्या नसतात हें सुद्धां ठाऊक होतं. त्याचं तोंड गोरंमोरं झालं, चेहऱ्यावर गोंधळ माजला. "सर्व्या मर्द न्हवं आवाचा—" बटचा अडखळत बोलला, "तवां तोसुद्धां निजायचा आवाच्या बाजूलाच—"

"अच्छा! आणि मग—" टकल्या विचारीतच राहिला. इतकं सांगितलं पण ह्याचं काय समाधान होत नव्हतं.

आणि वट्ट्यानं ताडकन् सांगून टाकलं, "कबीकबी रातला जाग यायची तवां मालूम व्हायचं. दोघाचं कायवाय चाललं हाय. पण सच सांगतूं भांडण नाय, मारामारी नाय. ह्या टायमाला आवा आन् सर्व्या समदं पार इसरून, भुलून एक व्हत. खाजगी वातचीत चाले. सर्व्या माजाच खयाल करी. आवाच्या कानांत ह्यानं कुजबुजावं, आपून एक झालोंत अशीं. पण वाय गो वच्च्याला असं वाय होऊं द्यायचं– असं नाय होऊं द्यायचं ! पारव्यावाणी हा घुमत ऱ्हाई. आन् कबुतर कशी आवा साथ देई. समदं ऐकून ऱ्हाई. त्याला समदं करूं देई. आन् फिरबी ही निवत नसे. सर्व्या घुश्श्यांत वरडी, पड गो वाय चिप्प. दमलूं मी. आवा वसवसत ऱ्हाई, कैसा रऽ मर्द तूं? आन् मीसुद्दां कसली आवा?..."

"बेटा, भलताच चलाख तूं !" सरकारी वकिलानं मत दिलं. आणि डावा डोळा मिटून हंसत म्हटलं, "खूप ध्यानांत रहातं आं–आवाचा कोणी दुसरा मर्द होता काय रे ?"

वट्याला हा प्रश्न वेडेपणाचा वाटला. "हट् ! औरतला एकच मर्द असतो....."

"पण काहीं वायकांना एक नाहीं पुरत. दुसरा लागतो." काळ्या डगल्यांतील टक्कल्यानं खुलासा केला. "हक्काचा मर्द बाहेर पडला का हा दुसरा मर्द चोरून घरांत शिरतो."

"बुढ्ढ्यानं खून केला असता ह्याचा साहेब. आन् मीसुद्धां"

"मग नाहीं केलांत ?"

"पर्संग आला तेव्हा केला. सर्व्यानंच–" वट्यानं रुबावांत सांगितलं.

"आं !" सरकारी वकील एकदम ओरडला. त्याचा चेहरा खुलला. अखेर पोरगं फसलं होतं. जाळ्यांत सांपडलं होतं. "अच्छा ! तर प्रसंग आलाच ना ?"

"बुरी वात, साहेब ! वडी मुसीबत आली ! हनूणतर समदं गेलं; पयलं झोपडं" वट्यानं तोंड वांकडं केलं. त्याच्या काळजांतली चीर अजून सांधली नव्हती. डोळ्यांत अजून पाणी आटत नव्हतं.

"एक गेलं, दुसरं बांधूं !" टकल्यानं उत्साहानं आश्वासन दिलं.



"अबी नाय पायजे ! हायच कोण आत्तां ! एकटा मी – एकटा मी ! ऱ्हाईन असाच, पूलाखालीं नायतर फूटपाथला. सालीं मुन्शीपाल्टीचे लोक कधींबी येणार आन् झोपडं पाडून समद्याचा पार निकाल करून जाणार...लई वायट वाटतं मग. बुढ्ढा असाच मेला. झोपडं सोडाया तयार नव्हता. ताठ वसला, जाम ठाण मांडून. दारांतच–हलकट हीं मुन्शीपाल्टीचे लोक आले तवां. उठेनाच !..."

वकिलानं म्हटलं, "बुढ्ढा मेला ना ? अरे उसको मरनेदो !"

"काय मरनेदो ?" वट्या आतां मात्र खवळला, "ह्यां...ह्यां पोलीसच्या लोकांनी लाठ्यांनी दाणदाण मारला हो त्याला. टाळकं फोडलं. आन् साफ शुद गेली तवां टाकला ट्रकांत. रातला सर्व्या गेला चावडीवर तर मुडदा घेऊन जा म्हटले. काय करायचा व्हता आमाला मुडदा ? बुढ्ढा जिता वापस करा म्हणावं — वापस करा !"

छोकरा डोळे चोळत हुंदके देत सांगूं लागला. हमसाहमशीं रडत सुटला.

"वेडा का काय ? रडतोस – तूं ?" सरकारी वकील त्याची समजूत काढीत बोलला, "वट्या, रडतात लहान मुलं, आणि वायका. तुझ्या-सारख्या हुशार पोऱ्यानं कसं धीट असलं पाहिजे–"

"बुढ्ढा खपला हो साहेब," वट्यानं गळा काढला, "सर्व्यानं आणि आवानं त्याला मसनवटींत पुरला. वाजूला मी उवा व्हतों. दोन वोचकीं संवाळत. आन् माज्याकडे गोणपाटांत आमची विल्ली होती. ती वरडत होती म्याव्, भायर पडाया धडपडत व्हती. पण हिला मी सोडणार नव्हतो. ती वापस पहिल्या जागेंत गेली असती. माजी विल्ली माज्यासाथ हवी. और कोनच्या घरांत मी नाय ऱ्हाऊं देणार. पण सर्व्यानं ह्या सालीचा आवाज ऐकला. आन् तो वोलला, विल्ली कायकू लाया ? मी सांगितलं, माजी हाय ती. तवां लाया. आवानं इचारलं, अरऽ पण कुटं नेणार हिला ? मी म्हटलं, नया वस्तींत, नया झोपडींत. माज्यासाथ ! तंसा सर्व्या वोलला, येडा हायस. आयालाच नाय ऱ्हाया जागा. तुझी विल्ली कुटं ऱ्हाणार बच्च्या ? दे सोडूनशान तिला जाऊं दे वापस ! आन् मला लई वायट वाटलं. रडूं कोसळलं. नाय, माजी विल्ली मी नाय दुसऱ्याला देणार. हिच्यासाथ मी खेळलों व्हतों, तोंडचं म्हावरं काढून हिला टाकलं व्हतं, हिला प्वाटाशीं घेऊनशान निजत व्हतो. व्हय-व्हय ! माजी– माजीच व्हती विल्ली. तिनं दुसरीकडे ऱ्हावं, खेळावं, खावं आन् दुसऱ्यानं तिला प्वाटाशीं धरून लाड करावेत ही वात मला पसंत नव्हती. असं नाय होवूं देणार मी– कधींबी नाय ! मी रडतोंयसं देखून सर्व्या उखडला. आदींच चेहरा काळवंडला व्हता, दगदगला व्हता. तर हें – माजा हट ! इवळे वटारून गाळी देत हा फुडं आला. तसा मी धुम पळ काडला. समूरच तो नाला व्हवं का ? घाणपाण्याचा. तिकडे कांठावर उवा ऱ्हायलों. आन् गोणपाटासकट विल्ली दिली भिरकावून नाल्याच्या पाण्यांत. गेली डुबून... सर्व्या वरडला, फुकट गोणपाट घालव-लान् प्वारानं. आन् आवा वोलली, विल्लीला मारलंस ? आतां जा काशीला. मी जाब नाय केला. वायट वाटत व्हतं आन् बरंबी !... "आपली चीज आपल्याला नाय मिळाली तरी चालल. फिर और कोणाला मिळाली नाय पायजे..."

"बरोबर आहे ! बिल्कुल ! तुझ्या जागीं मी असतों ना वट्या तरी









हेंचं केल असतं." सरकारी वकिलानं त्याचं खोटं कौतुक केलं.

कोल्ह्यासारखा धूर्त हा वकील. सगळा अनुभव, पक्का दर्दी ! उगाच नाहीं ! सहानुभूतीचं नाटक करीत बटयाला तो बोलला, "अरेरे, झोपडं गेलं, वुढ्ढा गेला, तुजी बिल्लीसुद्धां.....

"वारीशचे दिस साहेब, आन् आमी भटकत व्हतों – सर्व्या, आवा आन् मी. इदरसे उदर आन् उदरसे इदर ! झोपडयांतवी कुटं काय जागा नव्हती. आन् झोपडी उवाऱ्हायला सर्व्याच्या पास पैका नव्हता. इतनी वडी मुंवई, समदी घरांनी आन् आदमीनीं भरलेली. खालीं खाली रस्ते. पण उपरसे आवाळालासुद्धां गळती लागली व्हती. पावसा पाण्यांत वल्या कपडयांनीं चिकलांतून चार दिस खालीपिली भटकण्यांत काडले. सर्व्याला घद्यांलावी जातां येत नव्हतं. कारण आमी कुठं ऱ्हायचं? हाय जाव ? पण वघा, एकाला आली दया. आन् तीसुद्धां आवाला देखून. हा माणूस झाला साहेब तयार, आपल्या खोपटांत जागा द्यायला. व्हता अकेलाच. आन् सोता ऱ्हात पण नव्हता हिकडे. सर्व्याला नव्हतं पसंत. पण आवा ऐकेना. वरडली, वुढ्ढयाला पुरलंस. आतां मला आन् माज्या बच्यालावी टाक मारून. मग झालास रऽ मोकळा. आन् तिनं मोटयानं गळा काडला. इतकं झालं व्हतं पण आवानं अजून डवळयांतून पाणी नव्हतं काडलं. तर हीसुद्धा खलास झाली व्हती, वैतागली व्हती. कुटंवी, कसलीसुद्धां पडण्यापुरती जागा मिळाली तरी–जादा कायबी नको व्हतं तिला ? आन् मलासुद्धां. व्हयं ! उबं ऱ्हायची ताकद नव्हती पायांत. मी तसाच पडलों आवाच्या मांडीवर. आन् आवा वरडली, "माज्या देवा! अरऽ प्वाराला ताप हाय..." बटया एकदम अडखळला. रेसचं घोडं धावतां धावतां मध्यंच विचकतं तसं. तारवटल्या डोळयांनीं छोकरा वघतच राहिला. झपाटल्यासारखा.

"अरे – ते – पुढं ?" टांगेवाल्यासारखा सरकारी वकील त्याला चावूक हाणूं लागला, "पुढं पुढं आवाचा खून झाला–"

"व्हय ! " काळजांत कळ येऊन पोरगं किंचाळलं, "दोनचार दिसांत.."

"सर्व्यानं गळा दावून तिचा प्राण घेतला. खरं कीं नाहीं ?" टकल्या पोलीसांसारखाच आत्तां त्याच्यामागं लागला होता. तोच हुकमी आवाज, तेच ठराविक शब्द......

चीड यावी, घुस्सा व्हावा. पण भय वाटावं. जाव करणंच भाग पडतं. नाहींतर निभाव नसतो. बटयानं खालच्या मानेनं हळूंच म्हटलं "व्हय!"

"कां ? कां ?" टकल्या समोर लाकडी कठडयावर हात आपटून विचारूं लागला, "आवा कोणा दुसऱ्यावरोबर धंदे करीत होती ?"

"धंदे नाहींत. निजली होती." बटयानं सरकारी वकिलाची चूक दाखवली.

"सर्व्या कुठं गेला होता ?"

"भायर. कामाला."

"आणि तूं ?"

"घुमत व्हतों. ह्या नया वस्तींतल्या प्वारांच्या साथ...सर्व्याला दुरसे येतांना देखलं आन् भागलों व्हतों..."

"तर खोपटाचं दार वंद..." वकिलानंच त्याचं वाक्य पुरं केलं.

"व्हय. खूप वरडलों आवा दार खोल, खोल दार. ती उघडीनाच












आंतून वरडली, जा, घुम भायर. मी कामांत हाय. पण मला डर सर्व्याची. शिकपणांत मी भायर खेळतों हें कळलं तर हा माजा जीव घेईल ही धास्ती. आवा सर्व्या येतूंया. मला भायर देखून घुस्सा भरील. आवा ऐकूनच घेत. नव्हती. का तिला ऐकूंच येत नव्हतं. मी मात्र वाजवीत वरडत व्हतों. आन् सर्व्या आला. मला भायर वघून ह्याला लई चीड आली. गाळी करीत ह्यानं माजी मानगूट धरली आन् म्होरं दारावर लाथ मारीत वरडला, आवा दार खोल ! खूप वरडला मोठमोठ्यानं. पण आवा दार काय उघडीना. आन् जाब दिईना.....

"अच्छा ! मग रे ?"

"माज्या नाय, सर्व्याच्या मनांत कायवाय आलं. त्याला आला संशय. खोपटाच्या दारावर जोरांत चार लाथा घातल्या त्यानं. कवाड भक्कम नव्हतं.धाडकन् वाजूला झालं. आन् सर्व्या आंत झाला. मला ह्यानं म्हटलं, वच्चा तूं भायरच -हा. कोण आलं गेलं तर ध्यान दे जरा. आला व्हता एकच. झोपडीचा मालक. पण हा आला व्हता आंतून, चोर कसा. ह्याचं त्वांड शेण खाल्ल्यासारखं झालं व्हतं. तो व्हता घाईत. मला धक्की लागली तरी त्याचं माज्याकडे लक्ष नाय गेलं. तसाच घुम पळत -हायला..आन् मग थोड्या वेळानं सर्व्या भायर आला. दारू प्याल्यासारखे ह्याचे ड्वळे व्हते आन् नुसता झिंगत चालत व्हता. हातपाय थरथर कांपत व्हते. जड आवाजांत मला हा वोलला, बच्चा जातूं रऽ मी. इसरूं नग सर्व्याला. पछान ठेव. बास् ! आन् निगालासुद्धां. मला मालूम व्हतं – त्याला वाईट वाटलं व्हतं आन् वरंबी ! बिल्ली नाल्यांत डुबवली तवां मलासुद्धां असंच झालं व्हतं. व्हय असंच ! पण – पण– आन् मागं मी झोपडींत घुसलो. आवा सामनं




जमिनीवर आडवी पडली व्हती. अंगावर काय नेसण नव्हतं. थंड व्हत्ती ही, गार मुडदा होऊन. मी उवा -हाऊन वघत व्हतों. आन् ! तिच्या गळ्यांत मणी दिसला. झडप टाकून मी तो हिसकला. धावत भायर आलों वरडत, सर्व्या अरऽ हा -हायला तुजा मणी. पण सर्व्या वेपत्ता झाला तो –झालाच ! येडा! गोणपाट गेला म्हणून मला वरडला आन् सोन्याचा मणी आवाच्या मढ्यावर टाकून सोता पळाला तवां...?"

"तो मणी कुठं आहे ?" सरकारी वकिलानं विचारलं.

"हायच कुटं आत्तां ? इकला मी– दोन रुपाये मिळाले. सर्व्याला किती सोदायचं ? सांपडना तवां टाकला इकून मणी."

"सर्व्याला इथं तुझ्या पुढ्यांत उभा केला तर ओळखशील ?" टकल्यानं जोरांत विचारलं.

"व्हय ! वळखला नाय एकदा. पण पोलिसांनी दावला तवां तो पाठ करून उवा व्हता." वटयानं फणफणत म्हटलं.

"मग वघ, समोर वघ ! हा काय सर्व्याच उभा आहे." सरकारी वकील हात उडवीत आरोपीच्या पिंजऱ्याखालीं येऊन ओरडला.

वटया डोळे फाडून समोर वघत राहिला. ह्या आरोपीकडे एक किरकोळ, फाटका, दुवळा माणूस उभा होता. त्याच्याकडे वघत. छेः ! त्याचा सर्व्या असा मुळीं नव्हताच. तो ताठ होता, अंगानं मजबूत होता, आणि त्याला दाढी होती.

"हट् ! साहेव, हा नाय सर्व्या !" वटयानं ओरडून सांगितलं.

"आं ! अरे नीट वघ–" टकल्यासुद्धा बिचकला, जरा अडखळला.

"नाय, नाय, नाय ! फुकट बनवलंत तुमी लोकांनी मला. हा कोण दुसराच हाय! " वटया डोळे चोळूं लागला. हुंदके देऊं लागला, "सर्व्याला दाढी हाय साहेव. आन्... आन्... हा सर्व्या असता तर मला देखून असा गप्प नसता -हायला. धांवला असता माज्याकडे, मला त्यानं जवळ वढलं असतं, प्वाटाशीं धरलं असतं. असा खालीं मान घालून बटयाची गंमत बघत उबा नसता -हायला – नसता -हायला."

सरकारी वकील निरुत्तर झाला होता. खांदे उडवीत अन् कपाळ खाजवीत बटयाकडे बघत राहिला. काय करावं, कसं बोलावं – त्याला काहीं कळेना.

प्रतिपक्षाच्या वकीलाकडे बघून हताशपणं त्यानं सांगितलं, "पोरगं बिथरलं. आतां तुमचं होऊं द्या–"

"काय गरज आहे ?" काळ्या डगल्यांतला पिकल्या डोक्याचा हा वकील खिदळत ओरडला. "अरे कशाला खटले चालवतां ? सलूनं चालवा–"

तिकडे आरोपीलाच एकाएकीं वाचा फुटली. न विचारतां, न सांगता हा ओरडून राहिला, "सरकार, मीच गुन्हा केला हो... मीच खून...."

"अरे, तूं गप्प रहा. शब्द काढूं नकोस–" आरोपीचा वकील त्याला सल्ला देऊं लागला.

तरीसुद्धां निमूट बसायला आरोपी तयार नव्हता. तो मोठ्यानं वोंबलत सुटला, "बोलणार, गप्प नाय -हावत आतां! बच्च्यासुद्धां वळखत नाय मला. आं ! कशाला जगूं वर ? मीच सर्व्या, सरकार...मीच सर्व्या....!"

● ● ●

अनुक्रमणिका

# एक सेव्हिंग्ज बँक अकाउन्ट उघडा




## नॅशनल ॲन्ड ग्रिन्डलेज

नॅशनल ॲन्ड ग्रिन्डलेजमध्ये सेव्हिंग्ज बँक अकाउन्ट उघडणें अत्यंत सोपे आहे. फक्त ५ रु. इतक्या लहानशा रकमेची जरूर आहे व तुम्हांला वर्षाला ३% व्याज मिळतें.

तुमच्या जवळपास असलेल्या आमच्या स्थानिक शाखेस आजच भेट द्या व पूर्ण माहिती विचारा. तुमचा कोणत्याहि स्वरूपाचा बँकिंगचा प्रश्न असो, येथें कार्यक्षमता व कार्यतत्परता तुमच्या सेवेस हजर आहे.



## नॅशनल ॲन्ड ग्रिन्डलेज बँक लिमिटेड

संयुक्त राज्यांत संस्थापित ● सभासदांची जबाबदारी मर्यादित

NGB/59 B MA R

**मुंबईतील शाखा** :—९०, महात्मा गांधी रोड ; २७०/२७२, डॉ. दादाभाई नवरोजी रोड, (लॉइड्स ब्रँच) ; मिंट रोड, (मिंट रोड आणि सर फिरोजशहा मेहता रोडच्या कोपऱ्यावर) ; २१/२९, प्रिन्सेस स्ट्रीट, (लॉइड्स ब्रँच) ; ११७-११९, काझि सैयद स्ट्रीट, मांडवी ; ६५एफ, लिंकिंग रोड, सान्ता क्रुझ ; २/५७१, गोआलिआ टॅन्क रोड, कम्बाला हिल ; शिवाजी मंदि., न. चि. केळकर रोड, दादर ; २४बि, क्लब रोड, भायखळा. **ठाणें** :—आग्रा रोड, कोलशेत रोड, (कॅसल मिल्सच्या जवळ).



**-रजनी कर्णिक**

**भगिनी मंडळाचा वाढदिवस आणि कवि केशवसुतांची पुण्यतिथी—म्हणजे बारसं आणि बाराव्याचा संयुक्त कार्यक्रम! कानाला कसंसंच लागतं नाहीं? पण ठरलं म्हणजे ठरलं! कार्यक्रमाची आंखणी अगदीं अभिनव होती—**

**तुम्हांलाही आमंत्रण आहे! अगदीं सहकुटुंब सहपरिवार! चलायचं ना?**

**टवाळवाडी** गांवांतील ढमढेरीण बाईंच्या माडीवर आज 'हाऊस फुल्ल' ची पाटी लावतां येईल इतक्या बायका जमल्या होत्या. आतां, बऱ्याचशा मुंग्या आणि बऱ्याचशा बायका जमावयाला तसंच कांहींतरी कारण असावं लागतं. त्याच गांवांतल्या मित्रमंडळाचे प्रमुख हरिभाऊ भांबुर्डीकर यांचं तर असं मत होतं कीं पावसाळ्यांत मुंग्यांना पंख फुटून त्या जशा घरभर उडूं लागतात, तसा हळदीकुंकवाचा मोसम सुरू झाला म्हणजे बायकांना गोठ, तोडे, पाटल्या वगैरे अलंकार फुटून त्या गांवभर सैरावैरा करीत भटकतात. त्यांच्या मतें बऱ्याच बायकांनीं एकत्र जमणं ही गोष्टच मुळीं आकाशांत शेंडे नक्षत्रं दिसण्याइतकी अशुभ होती. त्यामुळें कांहीं रिकामटेकड्या टवाळवाडीकरांनीं ढमढेरीणबाई उर्फ आक्काबाईंच्या त्या प्रफुल्लीत माडीकडे कुत्सित दृष्टिक्षेप टाकून 'आज काय हळदवणी कुंकवणी आक्काबाईंकडं?' (व्यंगोत्रिकार हरिभाऊ) भिवया विस्कटून आणि बत्तिशी उचकटून गरळोद्गार काढले. पण त्याच टवाळवाडीकरांना कुठल्याहि रहस्य कथेंतल्या मठ्ठ पोलिस अंमलदाराइतकीहि निरिक्षणशक्ति आणि तर्कबुद्धि असती तर त्याच क्षणीं दोन ठळक गोष्टी त्यांच्या चटकन् लक्षांत आल्या असत्या. विणकामाचं साहित्य बगलेंत मारून पायरीगणिक घांपा टाकीत जिना चढणाऱ्या वज्रचुडेमंडित सौ. पुतळाबाईंच्या पाठोपाठ काडवातींचा जस्ताचा डबा घेऊन गंगाभागीरथी म्हाळसाकाकूहि डोक्यावरचा पुन्हां पुन्हां सरकणारा 'मेला' पदर सांवरीत वर चालल्या होत्या. दुसरी गोष्ट, ज्या लगबगीनं बाया माडीवर चालल्या होत्या त्या लगबगीनं साखर फुटाणे, केळीं आणि खोबरं पदरांत वा रुमालांत बांधून कुणींच खालीं उतरत नव्हतं — तेव्हां हे हळदीकुंकु खास नव्हे. तेव्हां हें आहे तरी काय??? अशा आश्चर्यानें एखाद्या उपद्व्यापी टवाळवाडीकरानें उंदराप्रमाणें हळूंच वर जाऊन, मधमाशांच्या पोळ्याप्रमाणें खदखदणाऱ्या त्या लहानशा दिवाणखान्यांत जर डोकावण्याचं धाडस केलं असतं तर त्याला लागलीच कळलं असतं कीं, हा कांहीं हळदीकुंकवाचा 'थिल्लर पोरकट व पोकळ समारंभ' (इति हरिभाऊ वचनामृतम्) नसून कांहींतरी पोक्त गंभीर व घसघशीत अशी घटना आहे. कांहीं तरी शिजून राहिलंय्! •

तशीच होती खरी गोष्ट. गांवांत नवीनच निघालेल्या 'भगिनी मंडळाची' (पॉप्युलर नांव ताई मंडळ) आज तांतडीची बैठक होती. मंडळाची जन्मतिथि आणि कर्मधर्म संयोगानें महाराष्ट्र कविकुलगुरु केशवसुत यांची पुण्यतिथि एकाच दिवशीं येत होती. त्यामुळें बारशाची आणि बाराव्याची ही अद्भूत युति साजरी केल्याशिवाय हातची जाऊं देण्याइतक्या मंडळाच्या समासद कांहीं अगदींच बिनडोक नव्हत्या. इतकंच काय, गांवांतल्या मित्रमंडळाच्या (पॉप्युलर नांव भाई मंडळ) चांगलं नाकावर टिच्चून आपला हा डबलरोल पार पाडण्याचा त्यांनीं चंग बांधला होता. कारण दोनच दिवसांपूर्वी—'कै. केशवसुत यांची पुण्यस्मृति साजरी करण्याचा तुमचा बेत स्तुत्य असला तरी वडीलकीच्या दृष्टीनें तो हक्क मित्रमंडळाचा आहे. शिवाय मर्दाची पुण्यस्मृति मर्दांनीच साजरी करणं योग्य होय. तुमचे मंडळाचा वाढदिवस तेवढा साजरा करोन घ्यावा. कळावें.

ता. क. — (म्हणजे ताकाची कढी नव्हे!)

जोडीला पाकशास्त्राची चढाओढ लावल्यास बरे होईल!

असा सृष्टीच्या सुरवातीपासून पुरुषांनीं स्त्रियांवर गाजवलेल्या अरेरावीचा करकरीत पुरावारूप खलिता भाईमंडळाकडून आला असतां ताई मंडळानें त्यांस —

"एकवेळ नाकांतल्या नथी कानांत अडकवल्या जातील पण भगिनी मंडळानें योजिलेल्या कार्यक्रमांत कोथिंबीरीच्या काडी इतकाहि फरक पडणार नाहीं. बायांना स्वयंपाक घरांत डांबवून ठेवणं म्हणजे पगड्यांतून शेंड्या कोंबण्याइतकी सोपी गोष्ट राहिली नाहीं आतां...

ता. क.– (म्हणजे तारेवरची कसरत नव्हे.)

वाटल्यास लक्ष्मीबाई टिळकांची रिकामी पडलेली पुण्यतिथि खुश्याल साजरी करावी. जोडीला खोखो, आट्यापाट्या आणि हुतुतुचे सामने ठेवल्यास जास्त योग्य होईल." असा झणझणीत निरोप पाठवून भाईमंडळाच्या नसत्या चोंबडेपणाला वेळींच पायबंद घातला होता. मंडळाच्या सेक्रेटरी ढुमरीणबाई उर्फ छत्रुताई त्याप्रसंगीं



अनुक्रमणिका



सात्विक संतापानें म्हणाल्या होत्या 'अगदी बेश केलत हो आक्काबाई. या रानवटांना भियाचं तरी किती. म्हणतात नां 'मित्यापाठी ब्रह्मदेव' तस्सं व्हायचं. बगा म्हणावं आतां कायशी मेली म्हणच आहे नां 'देखल्या देवा खेटरांची पूजा' तस्संच हवं यांना.

मित्रमंडळाचा जन्म होऊन जवळ जवळ बारा वर्षं झालीं होतीं. मंडळाचा खास उद्देश कोणताच नव्हता. कंटाळलेल्या जीवांनीं करमणुकीसाठीं एकत्र जमावं एवढाच उद्देश ! तेवढयासाठीं त्यांनीं एक छोटीशी जागाहि भाडयानें घेतली होती. स्वतःची वाद्ये—तबला, पेटी, सतार इ. जमवली. तसेच कॅरम, पत्ते, सोंगटया, बुद्धिबळ वगैरे साधनसामुग्री जमविली. रात्रीं मंडळाच्या जागेंत गंजिफा, कॅरम, बुद्धिबळ वगैरेची रंगणं पडावयाची व मधून मधून कुणीतरी शोकीन तबला पेटीहि बडवीत बसावयाचे. हळुंहळुं होळी, रामनवमी, कृष्णजन्म, दसरा इत्यादि सण मंडळांत थाटानें साजरे होऊं लागले. दसऱ्याला स्थापन झालेली त्यामुळें तो तर मोठया थाटानें उजवला जाई. आणि गांवांतल्या काशी–विश्वनाथ सार्वजनिक हॉलमध्यें कार्यक्रम होई. मंडळाचा वार्षिक अहवालवाचन होई. मंडळाचे एक सभासद व गांवचे दत्तकगवई पांडुबुवा यांचं, आमंत्रितांना पानसुपारी वाटण्यापर्यंतचा वेळ भरून काढण्यापुरतं तरी, हटकून गाणं होई. दत्तकगवई म्हणजे असं कीं गावांत पूर्वी नाथुबुवा बनारसी हे प्रख्यात गायक होते. ते खरे अस्सल गवई ! त्यांच्यानंतर गांवांत कोणीच गवई न राहिल्यामुळें गांवानें अगदी एकमतानें पांडोबा लुकतुके यांना पूर्वी कुठल्याशा नाटक कंपनींत सूत्रधार काम केलं या शिफारशीवर "पांडुबुवा" अशी पदवी बहाल करून गांवच्या रिकाम्या पडलेल्या गवयाच्या जागीं जुलूमानें बसविलें. अर्थात् पांडुबुवांचं गाणं लक्ष देऊन किती ऐकायचे कुणास ठाऊक ! पांडुबुवांच्या जोडीला मधून मधून कांहीं उत्साही सभासद नाटकांतले लहानसहान प्रवेश करीत. पुढें हरिभाऊ मंडळाचे प्रमुख झाले नि गणो-पांडो-नाना अँड कंपनी-सारख्या उपद्व्यापी लोकांचा त्यांचेकडे अड्डा जमूं लागल्यावर मंड-ळाच्या वृत्तींत बदल होऊं लागला. गाणं बजावण्याऐवजीं परनिंदेचे बेसूर आलाप वरचेवर निघूं लागले. गांवांतील कुलंगडी चव्हाटयावर आणणं आपलं पवित्रं कर्तव्य आहे असाच जणुं मंडळानें आपला समज करून घेतला व तदनंतर अहवालांत गावांतले बरे-वाईट प्रकारहि प्रकट होऊं लागले. कधीं कधीं तर नाटयप्रवेशांच्या रूपानेंहि गांवां-तली व्यंगं स्टेजवरची सोंगं बनून रंगूं लागलीं.

अशा रीतीनें मित्रमंडळाचा कार्यक्रम अबाधित चालला असतांना 'बगळयांच्या थव्यांत कावळयानं शिरावं' (इति श्री. हरिभाऊ उवाच) तसा एकाएकी भगिनीमंडळाचा जन्म झाला. भगिनीमंडळाचा उद्देशहि प्रथम प्रथम चार बायकांनीं एकत्र येऊन परि य वाढविणें. शिवणकाम, विणकाम कशिदा इ. कलांची देवघेव करणें, असा होता. पण पुढें ढमढेरीणबाईंची बदली मुलींच्या शाळेंत हेडमिस्ट्रेस म्हणून झाल्यावर व त्या गांवांत रहावयास आल्यावर मंडळाचं प्रमुख-पद त्यांच्याकडे गेलं व मंडळाच्या रंगरुपांत हळुंहळूं फरक होऊं लागला. विणकाम, शिवणकामास कनिष्ठ स्थान प्राप्त होऊन त्यांच्या जागीं पिंगपाँगचं टेबल आलं. ढोपरापर्यंत कासोटे मारलेल्या बाया व्हॉलीबॉल खेळून घामाघूम होऊं लागल्या. आत्मसंरक्षणार्थ लाठीचे वर्ग निघाले. समाजसुधारणा, स्त्रियांची उन्नति, समान हक्क





अनुक्रमणिका

वगैरे विषयांवर प्रवचनं व वादविवाद होऊं लागले. मित्रमंडळाच्या कार्यक्रमांत स्टेजवर शिवाजी महाराजांच्या मोठ्या फोटोला हार घालण्यांत येई तर भगिनी मंडळाच्या कार्यक्रमांत झांशीच्या राणीची मोठी तयार करून घेतलेली तसबीर होती तिला हार घालण्यांत येई. (हरिभाऊंच्या मतें ती झांशीची राणी नसून ताई तेलीण असावी). प्रथमतः पंधरवड्या-आठवड्यानें बायका जमत त्या आतां आठवड्यांतून तीनचार वेळां जमूं लागल्या. मंडळाच्या अनेक व वाढत्या प्रवृतीमुळें घरची कामं तुंबूं लागली. पोरावाळांची आबाळ व्हायला सुरवात झाली. कित्येक मित्रवर्यांना दुपारचा चहा हातानें करून घ्यायची पाळी आली – आणि या गोष्टींचा मित्रमंडळांत प्रामुख्यानें उहापोह होऊं लागला. त्यांच्या कार्यक्रमांत वक्ते आपल्या भाषणांत हटकून ही बाब आणीत व पाचकळ टीका करीत. हळुहळूं मित्रमंडळ विरुद्ध भगिनीमंडळ असं वातावरण उभं झालं.

भगिनी मंडळानें पाठविलेल्या उत्तरानें तर मित्रमंडळांत चांगलाच खळबळाट उडवून दिला. गणोबा मणसाळे, पांडोबा लुकतुके आदि मंडळाचे प्रमुख आधारस्तंभ रागानें हिरवेनिळे होऊन मोहरमचे ताबूत निघावेत तसा हैदोसदुल्ला करीत. फडांत जावयाला निघाले. फडांत म्हणजे अर्थात् मंडळाचे प्रमुख हरिभाऊ भांबुर्डीकर यांच्या ऐसपैस पडवींत. मंडळाच्या अनधिकृत कारवाया नेहमी इथं चालावयाच्या. पडवींत टांगलेल्या झोपाळ्यावर हरिभाऊ उघडेच बसले होते व हातांतल्या अडकित्त्यांत सुपारीची खांडोळी करण्यांत अगदी तन्मय होऊन गेले होते. त्यांच्याकडे पाहतांच 'दिसे ठेंगणी मूर्ति ही' या ओळीची आठवण व्हावयाची. अंगानं जसे ते ठेंगणे होते तसा त्यांचा घरसंसारहि अगदीं ठेंगणा होता. अंगणांतला भोपळा त्यांच्या पोरा-बाळांचा आकडा दर्शवीत होता. माजघरांत एक जख्ख म्हातारी– त्यांची दूसरी सावत्र आजी, रोज कुरकुरत आणि पुटपुटत त्यांच्या नांवानें चूल पेटवून धूर करीत असली तरी स्वतः मात्र ते विधूरच होते. एका मोठ्या सतरंजीवर तक्क्याला टेकून नाना घोसाळकर तोंडांतलं पान चवळीत नि मधून मधून जांभया देत चुटक्या वाजवीत व मधूनच दोन्ही हातांनी केस कराकरां खाजवीत पहुडले होते. वेळ कसा गाभण्या म्हशीसारख्या मोठ्या कष्टानं चालला होता... तेवढ्यांत गणोबा-पांडोबादि मंडळींच्या आरोळ्यांनी पडवी गजबजून उठली. बराच वेळ संथ आणि कंटाळवाण्या गतीनं चाललेल्या पौराणिक नाटकांत अचानक राक्षसपात्रांनी डरकाळ्या फोडून स्टेजवर प्रवेश करतांच जसे पेंगणारे प्रेक्षक खडबडून जागे होतात तसे हरिभाऊ आणि नाना, गणोबा, पांडोबांच्या दणदणीत आगमनानं हादरून गेले.

पडवीच्या पायऱ्या चढीत आणि हातांतला कागद डोक्यावर नाचवीत गणोबांनी घोषणा केली 'वाचला आतां हरिभाऊ ! तरी मी सांगत होतो महाराजा, असं मिळमिळीत लिहूं नका, पण लक्षांत कोण घेतो ?' गणोबांनी हरिभाऊंच्या नांवावर कोटी केली: त्यांच्या हातांतला कागद वांदराच्या हातांत सांपडलेल्या कबुतरानं निसटण्यासाठीं फडफडावं तसा फडफडत होता.

'म्हणजे, अहो काय झालं तरी काय ?' नाना उठून नीट बसले.

"वाऱ्यानं डोंगर कोसळला, बाबा ! कावळ्यानें चोंच मारून आकाश फाडलन्, मुंग्यांनी हत्तीचं धूड आपल्या बिळांत ओढून नेलं.... होत्याचं नव्हतं झालं, न् काय झालं म्हणून काय विचारतां ? हरिभाऊं, वैऱ्याची रात्रं आहे. शेंडी संभाळा !" पांडुबुवा नाटकी छटेंत बोलूं लागले.

कातरीत असलेली सुपारी सावकाश तोंडांत टाकून हरिभाऊंनी डोक्यावरून हात फिरवला व पाठीपर्यंत रुळणाऱ्या आपल्या भल्या लांबलचक शेंडीला एका झटक्यांत गांठ मारली. नंतर जवळच्या पिकदाणींत पचकन् थुंकून म्हणाले.

"हाँ आँताँ काँय तें साँगा!" जणुं काय शेंडीला चांगलीशी गांठ मारल्याशिवाय कुठलाहि महत्वाचा मुद्दा त्यांच्या डोक्यांत चटकन् शिरत नसे.

'सांगा काय कपाळ ? तुमचा त्रिफळा उडाला महाराजा'. गणोबा गरजले. 'अललल हु र्-र्र ! झांशीच्या राण्या चवताळल्यात दांत-ओठ खांत कंबरेभोंवती पदर कसून कपाळभर मळवट भरलाय त्यांनी !' पांडुबुवा भयानक अभिनय करीत सांगूं लागले. "झांशीच्या राण्या !" हरिभाऊंनी हिसड्यासरशी शेंडीला मारलेली गांठ सोडली व पुन्हां नीट बांधली. पुन्हां पचकन् थुंकून डोळे वटारले 'कुठल्या झांशीच्या राण्या ?'

आतांपर्यंत नानांनी गणोबांच्या हातांतील कागद घेऊन वाचावयाला सुरवात केली होती. डोकं कराकरा खाजवीत त्यांनी खिस् खिस् करून चौफेर हंसावयाला सुरवात केली. क्षणाक्षणाला त्याचं हंसणं वाढतच गेलं. "पगडींतल्या शेंड्या" मध्येंच हरिभाऊंकडे वळून ते कसेबसे दम छाकीत म्हणाले व पुन्हां खिस् खिस् करीत गणोबांच्या खांद्यावर मान टाकून खदखदायला लागले.... आतां मात्रं हरिभाऊंच्यानं राहवेना. झोपाळ्यावरून उठून नानांच्या हातून पडलेलं चिटोरं त्यांनी उचललं व झोपाळ्यावर पुनच्च बसून वाचूं लागले. वाचतां वाचतां भर रस्त्यांत केळ्याच्या सालीवर पाय पडून आपटी खाल्लेल्या इसमानं करावा तसा चेहरा त्यांनी केला. त्यांतला शेंडीचा उल्लेख फक्त आपल्यालाच उद्देशून आहे हा मुद्दा पक्का करण्यासाठीं त्यांनी पुन्हां शेंडीला हात घातला. पण अधिक घट्ट गांठ मारणें अशक्य असं वाटूनच कीं काय तो बेत बदलून व कागद भिरकावून नवी सुपारी रागारागानें कातरूं लागले.. नानांच्या हंसण्याचा भर ओसरल्यावर 'अगाईऽऽग' असं म्हणून डोळ्याला आलेलं पाणी उपरण्यानं पुसूं लागले. क्षणभरच... पडवी शांत झाली..... त्या सस्पेन्सचा फायदा पांडोबांनी घेतला. झोपाळ्यावर हरिभाऊंजवळ येऊन ते बसले. त्याबरोबर त्यांच्या भारानें झोपाळा कुरकुरला....पण ते कुरकुरणं बिचाऱ्या हरिभाऊंच्या पोटांतूनच निघालं असावं असा सर्वांना भास झाला. तबकांतली लवंग तोंडात टाकून पांडोबा नाटकांतल्या-प्रमाणें गदगद स्वरांत बोलूं लगले.

"हरबा ! आपल्या हिंदु धर्माचं प्रतिक अशा ह्या तुमच्या भव्य शेंडीला उपमा–म्हणजे नगाधिराज हिमालयावरून कोसळणाऱ्या गंगामाईची–अशा शेंडीचा अपमान...." यावर तोंडांत कोंबलेल्या

अनुक्रमणिका








सुपारीचं भान न राहून हरिभाऊं इतक्या जोरानें ओरडले कीं तोंडांतून निघालेल्या फवाऱ्याबरोबर सगळी सुपारी बाहेर... मग शब्द आले... 'बांगड्या भरा बांगड्या ! लेका आज मला हंसताय ! उद्यां तुमची पाळी येईल काय ? अजागळांनो, हा माझा अपमान नाहीं. हा मंडळाचा अपमान आहे ! मंडळाचा ! ! मंडळाचा ! !' पानाच्या डब्यावर अडकित्ता आपटत संशय कल्लोळांतल्या 'हा मंगळ, मंगळ, मंगळ बाधतो आहे मला !" असा त्रागा करणाऱ्या अश्विनशेटच्या थाटांत हरिभाऊ ओरडले.

'आणि अशा तशा मंडळाचा नाहीं महाराजा, बारा बारा वर्षांची तपश्चर्या पाठीशीं असलेल्या विश्वा-मित्रमंडळाचा !' गणोबांनी न राहवून कोटी केलीच !

'मला वाटतं तावडतोब मंडळाची बैठक बोलवावी' नानांनी सूचना केली.

'आणि सणसणीत निषेधाचा दणदणीत पांचजन्य करावा, असंच नां ?' हरिभाऊ तावातावानें म्हणाले... "आहो, तुमच्या निषेधाला कां जुमानणार आहे ती...ती..."

"ढालगज भवानी !" पांडुबुवांनी हळुच प्रॉम्प्टींग केलं !

ढमढेरीणबाईंना मित्रांतर्फे 'ढालगज भवानी' व हरिभाऊंना भगिनीतर्फे 'शेंड्या मारोती' अशा अरस-परस-पदव्या बहाल करण्यांत आल्या होत्या ही गोष्ट टवाळवाडींतील एक उघडं गुपीत होतं. हरिभाऊंनी अनावर झालेल्या रागानें शेंडीची गांठ सोडली. पाण्याचा तांब्या हातांत घेऊन 'या अपमानाचा सूड घेतल्याशिवाय रहाणार नाहीं, मगच शेंडीला गांठ मारीन' अशी जळजळीत भीष्मप्रतिज्ञा ते करणार असावेत असा सर्वांचा समज झाला. उत्सुकतेनें सर्वजण त्यांच्याकडे पाहूं लागले. हलाहल प्राशनाच्या वेळीं शंकरदादांच्याकडेहि देवदानवांच्या नजरा इतक्या उत्सुकतेनें खिळल्या नसतील... पण हाय ! शेंड्या मारोतीनं सर्वांची निराशा केली. सबंध तांब्या पोटांत रिचवून त्यांनी सावकाश शेंडीला गांठ मारली, नंतर एक मोठा निश्वास टाकून एक पान काढून त्याच्या शिरा काढूं लागले.

....इकडे भगिनी मंडळांतली चर्चा रंगांत आली होती. अक्काबाईंनी प्रथम पुण्यतिथि साजरी करण्याचा ठराव मांडला व तो सर्वानुमतें पसार झाला. कोपऱ्यांत बसलेल्या पुतळाबाईंनी मात्र न राहवल्यामुळें शेजारणीजवळ चौकशी केली. "पण मी म्हंनते, अहो, ते सगळं खरं ! पण हे केशोसुत का कोण त्यांचा कां म्हणून बाई असा उदो उदो करायचा आपण ? सांगा तरी." शेजारच्या बाई सांगूं लागल्या–'अहो, हे केशोराव भोंसले म्हणजे पट्टीचे गाणारे. आमच्या ह्यानीं लहानपणी त्यांना ऐकलं तर कां ? कानावर हात ठिवून नुसतं भोंकाड पसरायचे कीं तानांची भेंडोळीच्या भेंडोळी बाहेर पडावी म्हणतात. स्टेजवर केशोराव गायाला लागले म्हणजे बरोबरच्या पाट्यांना विंगमधनं खुर्च्या आणून द्याव्या लागाच्या बसायला. हो ना ?' पलिकडे बसलेल्या शारदाबाई हंसत हंसत म्हणाल्या "अहो! ते गाणारे केशवराव वेगळे बरं ! हे केशवसुत कवि कविता करायचे."

'अस्सं कां ? इश्श मेलं !' नाक मुरडून त्या बाईंनी आटोपतं घेतलं...' 'मला आपलं वाटलं....इश्श....'











इकडे ढमढेरीणवाई सांगत होत्या, 'तेव्हां आतां कार्यक्रम आंखावयाचा आहे. तरी ज्यांना ज्यांना त्याबाबत सूचना करायच्या असतील त्यांनी त्या पुढें मांडाव्या. ज्यांना कार्यक्रमांत भाग घ्यायचा असेल त्यांनी नांवं नोंदवावी. सगळ्यांनी कामं वाटून घ्यायला हवीत नाही कां हो छवुताई ?'

'हो ना ! ठुमरीणवाई उद्‌गारल्या. मंडळाच्या त्या सेक्रेटरी होत्या. अहो म्हणतात नां 'नकटीच्या लग्नाला शेंडीपासनं तयारी करावी लागते.'

'पहिल्या प्रथम केशवसुतांचा जीवनवृत्तांत, परिचय वगैरे श्रोत्यांना करून द्यावा लागेल. हे काम छवुताईंनी स्वतःवर घेतलय् तें योग्यच आहे कारण त्यांनी वरंच वाचलय् न् त्यांना काव्याची आवडही आहे. मधनं मधनं कविताहि करतात त्या !' 'हो ताई !' छवुताईंच्या शेजारी राहणाऱ्या कुसाताई सांगूं लागल्या 'खरंच हो, अडगुलं मडगुलं'च्या चालीवर त्यांनी दोन-चार गाणीहि रचली आहेत म्हणे.'

'छे व्बाई ! तुमचं तरी भारीच हो ! ठुमरीणवाई उसन्या विनयानें नक़ली मुरका मारीत उद्‌गारल्या, 'स्तुती म्हणजे किती करायची ती—अहो गुळ गोड लागला म्हणून मुळापासनं कां खायचा ?' सद्‌भाग्यानं त्यांच्या अजव म्हणीचा अर्थ लावावयाच्या भानगडींत सहसा कुणी पडत नसे.

ढमढेरीणवाई म्हणत होत्या –

'केशवसुतांच्या निवडक कविता गायनाचा एक छोटासा कार्यक्रम ठेवावा, मला वाटतं, वेणुताई, तुम्ही आपल्या गोड गळ्यानं...' वेणुताई या स्तुतींत अगदी गुलकंदासारख्या पिघळल्या. पण सौजन्यानें त्या म्हणाल्या, 'माझा किनई हल्ली मेला आवाजच लागत नाहीं पूर्वीसारखा. पण तुमचा आग्रहच असेल तर......'

समोरच्या बाजुस भिंतीजवळ कोपऱ्यांत बसलेल्या काशीबाईंनी, मथुरावाईंना कोपरानं ढुश्शी दिली न् पुटपुटल्या, ''ही गेंगाणी बया काय गाणार पण ? नाकपुड्यांत तर बोलत असते सदान् कदा...' मथुराबाई आजुबाजूला उद्देशून म्हणाल्या.

'त्यापेक्षां त्या बालगंधर्वांना बोलवा म्हणावं' पण ही कल्पना भगिनी मंडळाच्या ध्येयाविरुद्ध असल्यामुळें व साहजिकच आजन्म पुरुषांच्या कंपनींत स्त्रीपार्ट करणारे नारायणराव आतां स्त्रियांच्या घोळक्यांत पुरुषपार्ट करून 'बायकांत पुरुष लांबोडा' म्हणून घ्यावयाला तयार होतील कीं नाहीं म्हणून ही सूचना कुणीच पुढं मांडली नाहीं.

त्यानंतर घुमाळीणबाईंनीं एक कागद हातांत घेऊन जरा खांकरत पदर सारखा करीत आपला प्रस्ताव पुढें मांडला. एक नाविन्यपूर्ण प्रवेश त्यांनी लिहून आणला होता. थोडक्यांत तो समजावून द्यायला त्यांनी सुरुवात केली....

'इंद्रसभा भरली आहे व इंद्रसभेंत केशवसुत आणि गोविंदाग्रज यांच्या काव्यगायनाची चढाओढ ठेवण्यांत आली आहे. दोघेहि कवि आपआपल्या कवितांचीं बाडं काखोटीला मारून समोरासमोर उभे राहून आपआपलीं काव्यं ललकारताहेत. सामना अटीतटीचा होतो. टाळ्यावर टाळ्या पडताहेत पण शेवटीं केशवसुत त्यांत एकमतानें विजयी होतात. त्यांना वक्षिस म्हणून सोन्याचा कलश अमृतानें भरलेला, व गोविंदाग्रजांना चांदीच्या केळीच्या पानांत प्रशस्तीपत्रक अशी वक्षिसें श्रीमति इंद्राणीदेवीच्या हस्तें वाटली जातात. नंतर जमलेल्या मंडळींचे आभार मानण्याचे इंद्राचें भाषण होऊन – रंभा, उर्वशी वगैरे अप्सरांचा नाच व अत्तरदाणी गुलाबदाणी होऊन समारंभ संपतो....'

या प्रयोगावर खूप गरमागरम चर्चा झाली. शेवटीं प्रयोगाची अवाढव्यता व अवास्तविकता वगैरे लक्षांत घेऊन घुमाळीणवाईंच्या कल्पना चातुर्याची वरीच वाहवा केली गेली.... पण प्रयोग मात्र नाकारण्यांत आला. त्यामुळें, आणि प्रयोगाबाबत चर्चा चालली असतां ठुमरीणवाई 'शितावरनं भूताची परीक्षा' असं कांहींतरी म्हणाल्या होत्या त्यांतला 'भूत' शब्द आपणालाच उद्देशून असावा असा ग्रह झाल्यामुळें घुमाळीणवाई रागारागानें, हप्प होऊन घुम्यासारख्या एका वाजूला जाऊन वसल्या.

अशा रीतीनें दोन अडीच तास वाटाघाट होऊन कार्यक्रम एकदाचा नक्की झाला; व तालमींचे दिवस नक्की करण्यांत आले.

इकडे, कोंवडं झांकलं तरी तांबडं फुटतच त्याप्रमाणें गणोबा, पांडोबा, हरिभाऊ—नाना या चौकडीनं शक्य तेवढी खबरदारी घेऊनहि मित्रमंडळाला धाब्यावर बसवून भगिनीमंडळ आपला कार्यक्रम पार पाडण्याची जय्यत तयारी असल्याची मसालेदार बातमी गांवांत फोडलीच; व सर्वांच्या चर्चेचा तो एक विषय होऊन बसला. रोज नवीन नवीन अफवा उठूं लागल्या. त्यांत भगिनी मंडळाच्या कार्यक्रमाला पुरुषांना मज्जाव होता. इतकंच काय, पुरुषांनीं दादागिरी करूं नये म्हणून पोलीस पार्टी सज्ज ठेवण्यांत येणार आहे.... आणि पुरुषच ते बोलून चालून... फितूर झाल्यास शिवाय मंडळाचं अहिल्याबाई होळकर लाठीपथकहि लाठ्या घेऊन तयार राहणार होतं. दुसरी अशी हूल उठली होती कीं मित्रमंडळ व भगिनीमंडळ यांनी संयुक्तरित्या सदरहू कार्यक्रम करण्याच्या मित्रांच्या प्रस्तावावरहि भगिनींनीं नन्नाचा पोतेऱ्याचा बोळा फिरविल्यामुळें पिसाळून शेलकी शेलकी मित्रमंडळी कार्यक्रमाच्या दिवशीं हॉलवर पिकेटिंग करणार होती.

कार्यक्रमाला आतां अवघा आठवडा उरला होता. फडांत आज कांहींतरी खलबत चाललं होतं. नाना खालच्या स्वरांत सांगत होते,

"ऐकलंत हरिभाऊ, मंडळाची सगळीकडे नाचक्की चालली आहे."

"असेंच चाललं तर गांवांत थोबाड काढायला जागा रहाणार नाहीं. हरिभाऊ, कांहींहि करून या बायकांची डोचकी ताळ्यावर आणायला हवी महाराजा !" गणोबा उत्तरले.

'अलबत् हरिभाऊ, मित्रमंडळाचा हा डोंगर उचलून धरणारे तुम्हीं गिरिधारी आहांत, आळसरूपी अजगराच्या वेटोळ्यावर डोकं ठेवून झोपा काढायचं आतां पुरे भगवन्.

"यदा यदाहि धर्मस्य ग्लानीर्भवति सन्नार्यः

"लोकसंरक्षणार्थाय तोंड काढा हरिभाऊ."

पांडुबुवा कथेकऱ्याच्या थाटांत गाऊं लागले.

'तुम्ही तोंड काढा आम्ही दौड काढतो. तुम्ही पुढं व्हा, आम्ही










सांधली होऊन मागनं येतों. तुम्ही तांडवनृत्य करा आम्ही…आम्ही…. 'कोळ्याचा नाच करतो !' नाना खिः खिः करीत म्हणाले.

'पण अशी कांहींतरी युगत काढा कीं या ढालगज भवानीची सर्वादेखत फट्फजिती होऊन पुन्हां तोंड बाहेर काढणार नाहीं…. पांडुबुवा न डगमगतां हातवारे करीत सांगू लागले.

"अगदी फियास्को झाला पाहिजे" गणोबा.

तेवढ्यांत मंडळाचे एक बातमीदार घोंडोबा बावटळ लगबगीनं आले व हरिभाऊंच्या पुढ्यांत फतकल मारून हर्षवायु झाल्यासारखे सांगू लागले–

'आधी टाळी द्या ! अगदीं लेटेस्ट बातम्या आणल्या आहेत. ऐका !–पुरुषांना आमंत्रण आहे पण गॅलरींत वेगळी व्यवस्था आहे. हा ! हा ! द्या टाळी ! दुपारीं दोन ते चार फक्त स्त्रियां-साठीं मंडळाचा वाढदिवस साजरा होणार आहे… म्हणजे काय करणार आहेत जगदंबेला ठाऊक ! पण मय्या, कॉफीचा बेत आहे नक्की ! मग पांच वाजल्यापासून केशवसुतांच्या पुण्यतिथीचा मिक्स प्रोग्राम. हॉल नक्की केला आहे. टाळी द्या !….कुणीच टाळी न दिल्यामुळें घोंडोबा जरा नाराज झाले… हरिभाऊ विचारांत पडल्यामुळें गंभीरपणें बसून राहिले.

काल मला एक कल्पना सुचली. शेंडीला मस्त गांठ मारून थोड्या वेळानें हरिभाऊ उद्गारले—

'हे पहा, तिथल्या स्टेजला खालीं छोटसं तळघर आहे. काय ? त्या तळघरांत लाईटचा मुख्य स्विच् आहे. तळघरांत जायला हॉलच्या मागच्या बाजुनें एक छोटासा जिना आहे न् एक जाळीचं दार आहे. हॉलमधल्या प्रेक्षकांच्या दृष्टीस पडल्याशिवाय कोणीहि या तळघरांत गुपचूप जाऊं शकतो.'

'पण त्याला नेहमी कुलूप असतं' नानांची शंका.

'हॉलची व्यवस्था पाहण्याचं काम आपल्या मेढेकरांच्या पुतण्या-कडे आहे. तेव्हां तें काम सोंपे आहे. काय ? आणि स्टेजवरहि उजव्या विंगजवळ वरच्या बाजुला उघडणारा एक छोटा चोरदर-वाजा आहे. त्यांतून एक माणूस खालून वर किंवा वरून खालीं जाऊं शकतो. या दाराला कडीकुलूप नाहीं. पण त्याचा उपयोग नाहीं आपणाला. आपण उपयोगांत आणायचा मागचा दरवाजा. काय ?

'आया ! ध्यानमे आया !' डोळे बारीक करून पांडुबुवा म्हणाले. –'आणि बायका ऐन रंगांत आल्या म्हणजे मेनस्विच पाडून अंधार गुडुप्प करावयाचा. हा ! हा ! न् चोर दरवाजांतून पांढरा झगा घालून हॅम्लेटच्या बापासारखं बाहेर निघायचं. हडळीच्या थाटाला भुताचा नाच. डोळे वटारून पांडुबुवांनी भुतांचा अभिनय केला. त्याबरोबर एकच हंशा पिकला.

'मूर्ख करोति वाचाळं !' पांडुबुवा तुम्ही आपल्या नरड्याला जसा व्यायाम देतां तसा डोक्याला देत नाहीं कधीं ! अहो तानशेठ ! भुतांचा वावर रात्रीं बारानंतर असतो' हरिभाऊ रागानेंच म्हणाले.

'आणि इतक्या हडळींत एका भुताचं काय चालणार ? हा ! हा! द्या टाळी' घोंडोबा बावटळ चित्कारले.

'हे बघा, बायका भुतांना घाबरत नाहींत इतक्या उंदराला भितात. ठाऊक आहे ?' हरिभाऊ सांगूं लागले – 'जर कार्यक्रमाच्या वेळीं, खास करून त्या ढालगज भवानीच्या भाषणाच्या वेळीं जर स्टेजवर उंदीर सोडतां आले.....'

'तर झांशीच्या राण्यांचा नुसता 'झपूर्झा गडे झपूर्झा' होऊन जाईल महाराजा.'

'छान छान, मस्त आयडीया आहे. पण हे जमायचं कसं ! हरि-भाऊं मूषकास्त्र सोडण्याचा एकादा मंत्रबित्र साध्य केलायत कीं काय ?' 'ऐका तर !' हरिभाऊ खालच्या स्वरांत सांगूं लागले– 'स्टेजवरचा एक फूटलाईट काढूनच टाकलाय. त्यामुळें तिथें तळहाता-इतकं भगदाड पडलंय. कुणीतरी उंदीर पिंजऱ्यांत पकडलेले घेऊन मागच्या दरवाजानें त्या तळघरांत जाऊन बसावयाचं. थोडा वेळ आघी. काय ? स्टेजवरचा शब्दन् शब्द खालीं ऐकू येईल. योग्य संधि मिळतांच पिंजऱ्याचं वरचं झांकण उघडून त्या भोकाजवळ पिंजरा दाबून घरावयाचा– स्टेजवर जाण्याशिवाय रस्ताच नाहीं उंदरांना?

'पण हें काम करायचं कुणीं ?' नाना उगाच किंचाळले.

'आस्सं कां ? आत्ताच म्हणत होतां लेको, तुम्ही तोंड काढा आम्ही दौड काढतो…' हरिभाऊ हेटाळणीच्या स्वरांत बोलले. 'आणखी असही म्हणालो होतो तुम्हीं पुढं व्हां आम्ही मागुनी येतों' 'बरं…आपण चिठ्ठ्या टाकूं या' निश्चयानें हरिभाऊ म्हणाले. "पण पहा बरं ! या उंदराचं त्या उंदराला….चच…आयभीन या कानाचं त्या कानाला… काय ?" नाना.








नंतर चिठ्ठ्या टाकण्यांत आल्या. आणि नांव निघालं हरिभाऊंचच आणि दांत-ओठ खात हरिभाऊंनी शेंडीची गांठ सोडली न् पान उचललं.

एकदाचा तो दिवस उगवला. वायकांचे कॉफीपान वगैरे कार्यक्रम मोठ्या उत्साहानें व फारसा गोंधळ न होतां पार पडलें. या कार्यक्रमाला फक्त स्त्री सभासदच हजर होत्या. त्यानंतर आमंत्रित मंडळी यावयाला सुरुवात झाली. पाचाचे टोले पडले तेव्हां हॉल खाली-वर नुसतां फुलून गेला होता. मित्रमंडळाचे झाडून सर्व सभासद गॅलरींत माऱ्याच्या जागा रोखून वसले होते. साडेपांचाला कार्यक्रमाला सुरुवात झाली.

शिटी वाजून पडदा वर जातांच पांचसहा शाळकरी मुली नमनाला उभ्या राहिल्या. त्यांनी 'वक्रतुंड गणराज गजानन' हे पद म्हटलं. कोपऱ्यांत ठेवलेल्या राणी लक्ष्मीवाई (कां ताई तेलीण) च्या फोटोला हार घातला होता. नंतर रांगेंत उभ्या राहून 'भो पंचम जॉर्ज भूप', धन्य धन्य विबुध मान्य सार्वभौम भूवरा' या काव्यावर-हुकूम ठुमरीणवाईंनीं तयार केलेलं—

"भो केशवसुत खूप धन्य धन्य

विबुध मान्य, सार्वभौम कविवरा"

हे सद्गत कवींच्या स्तुतीपर गायन खड्या सुरांत म्हटलं. नंतर पडदा पडला; व थोड्या वेळानें पुन्हां वर गेला तेव्हां स्टेजवर फुललाईट करण्यांत आला होता

मध्यभागीं टेवल—त्यावर टेवलक्लॉथ, फ्लॉवरपॉट वगैरे मांडणी होती. टेवलाच्या मागच्या वाजूला अर्धचंद्रकार अशा आठ—दहा खुर्च्या मांडल्या होत्या. त्यावर भगिनीमंडळाच्या मुख्य मुख्य सभासद मोहनमाळेच्या पदराप्रमाणें विराजमान झालेल्या दिसत होत्या. प्रथम ढमढेरीणवाईंनीं एकाद्या रिंगमास्टरच्या थाटांत सर्वांना अभिवादन केले व सुंदरावाई डॉक्टरीणवाईंना (अर्थात् यांचे यजमान डॉक्टर होते) अध्यक्षस्थान स्वीकारण्याची विनंती केली; त्यांनीहि गजगामिनीप्रमाणें विंगमधून डुलत डुलत येऊन ते स्वीकारलं. तसा टाळ्यांचा कडकडाट झाला. गॅलरी मात्रं स्थितप्रज्ञाप्रमाणें शांत व स्तब्ध होती. प्रथम ठुमरीणवाईंचं केशवसुतांचा जीवनपरिचय करून देणारं अस्खलीत भाषण झालं. नेहमींप्रमाणें त्यांच्या भाषणांत त्यांच्या अद्भूत म्हणींची जागोजाग पेरणी होतीच. उदा. एका ठिकाणीं त्या म्हणाल्या, 'अडचणीच्या खोलींत उंदरांचा सुळसुळाट व्हावा तसा हल्लीं साहित्यांत कवींनीं धुमाकूळ माजवलाय. मेली म्हणच आहे नां 'मूताच्या हातीं कोलीत् द्यावं' त्याप्रमाणें जो उठला तो आपलं काव्य पाजळूं लागला.' 'नंतर... केशवसुत हे नव्या मनूचे नवे शिपाई होते. ते नुसते कवि नव्हते. समाजसुधारक कवि होते. आतां सुधारणा सगळ्यांनाच हव्या असतात. पण पहिलं पाऊल टाकायला कुणीं धजत नाहीं. अहो, मांजराच्या गळ्यांत उंदीर वांधायचा कुणी ?' त्यावर गॅलरींतून टारगट आवाज आला 'अहो, उंदीर नाहीं घंटा' त्यावरोवर बऱ्याच वायका हंसल्या. पण थोड्याच वेळांत त्यांनीं जेव्हां सिक्सर मारली कीं 'हल्लीं काय म्हणे नवकाव्य निघालंय्. काव्याला म्हणे वंधन नको ! कसला ना ताळ ना तंत्र. हो ना ! 'अहो, नाचतां येईना तर म्हणे ढुंगण वाकडं' तेव्हां मात्र वराच वेळ हॉल हास्यानें दणाणून गेला....त्यानंतर कु. वेणुताई घाटपांडे यांनी केशवसुतांच्या निवडक कविता म्हणून दाखवल्या. सुरवात वरी केली पण मग काय झालं कुणास ठाऊक ! त्यांच्या घशाला कोरड पडली. दम लागूं लागला. व शेवटीं गोविंदाग्रजांनीं केलेली 'केशवगुत कसले मेले, केशवसुत गातचि वसले' या काव्य गायनाच्या वेळीं दम छाकीत 'कसले मेऽले, केशवसुत गातच वसले' अशी ओळ त्यांच्या तोंडून निघतांच अर्थाच्या अनर्थामुळें सगळा हॉल खास करून गॅलरी पुन्हां एकदां हास्यानें दणाणून गेली. त्यामुळें त्यांनी काव्य पटकन् आटोपलं. त्यांच्या नंतर एकदोन वायकांची लांवलचक पण रुक्ष भाषणं झालीं. आतां वहुतेक वायका कंटाळल्या होत्या, पोरं चुळवुळूं लागली होती. व बऱ्याच कारट्यांनीं निरनिराळ्या कोपऱ्यांतून निरनिराळ्या सप्तकांत रडायला सुरुवात केली होती.

त्यानंतर ढमढेरीणवाई उठल्या. त्यांनीं आपल्या भाषणांत प्रथम भगिनी मंडळाचा थोडक्यांत इतिहास सांगून, मंडळाच्या कामगिरी-वद्दलची माहिती सांगितली. नंतर आजच्या स्त्रिया, त्यांची कुचंवणा व पुरुषांच्या शिरजोरपणावर ताशेरे झाडावयाला सुरुवात केली. पाश्चात्य स्त्रियांचीं उदाहरणं दिली. त्या स्त्रिया पुरुषांच्या वरोवरीनं कशी कामं करताहेत, रणांगणावरसुद्धां स्त्रिया वंदुकी घेऊन कशा लढताहेत......... आणि मग त्या एकाएकी वोलावयाच्या वंद झाल्या. स्टेजवरच्या फटींतून एक उंदीर टुणकन् उडी मारून आंत आला होता न् त्यांच्याकडे टक लावून पहात होता. दिव्याच्या प्रकाशांत त्याचं तेलकट शरीर आणि वळवळणारी शेपटी किळसवाणी दिसत होती. आणि त्याचे डोळे.... त्यांच्या हातांतला कागद गळून पडला. नाका-तोंडात पाणी शिरलेल्या माणसानें आवाज करावा तसा विचित्र आवाज त्यांनीं काढला. त्यावरोवर तो भयंकर प्राणी क्षणांतें डाव्या विंगमध्यें अदृश्य झाला.... गॅलरीत मात्रं वरीच हंसाहंस व गडवड चालली होती. उंदीर दिसेनासा होतांच ढमढेरीणवाईंना वराच धीर आला. पडलेला कागद त्यांनी निवांतपणें उचलला, व भाषणाला पुन्हां सुरुवात केली. अध्यक्षिणवाई जाड भिंगाच्या चष्म्यांतून किलकिलत्या डोळ्यांनी चमत्कारिकपणे त्यांच्याकडे पहात होत्या....पण ढमढेरीणवाईच्या आवाजांत आतां मगाचचा जोम नव्हता.

'स्त्रियांनी आपली उन्नति आपल्याच हातांनी करून घेतली पाहिजे. त्यासाठीं धडाडीनं त्यांनी पुढं यावयाला पाहिजे....' त्या पुन्हां डोळे फाडून पाहूं लागल्या. त्याच फटींतून पुन्हां एक उंदीर वाहेर पडला होता. त्यांनी टेवलाचा आधार घेतला व हातांतल्या कागदानें हवेंत वार करीत एक-दोन वेळा 'शु: शु:' केलं. आणि काय चमत्कार ! जादु केल्याप्रमाणें त्याच्या जोडीला दुसरा एक उंदीर त्या फटींतून निघाला. तो वराच लोध्या होता. चार वटवटींत डोळे आतां त्यांच्याकडे पाहूं लागले. त्यांच्या अंगावर शहारे आले. आणि जगदंवे....दोघेहि त्यांच्याच दिशेनें चाल करून येऊं लागले होते ढमढेरीणवाईंनी एक आर्त किंकाळी फोडली त्यावरोवर त्या दोन्हीं









चांडाळांनीं घाबरून एकदम मोर्चा वळवला व स्टेजवरून खालीं उड्या मारल्या त्या सरळ प्रेक्षकांत ! पहिल्या दोन रांगांतल्या बायकांनी आतां किंकाळ्या मारण्याची जणुं आपसांत शर्यतच लावली. बऱ्याच बायका उठल्या व पळूं लागल्या–पोरं रडूं लागली–आणि गॅलरींत पुरुषांच्या हंसून हंसून मुरकुंड्या वळूं लागल्या. स्टँपिंग, शिट्या, खि: खि: खिदळणं वगैरेंना नुसता ऊत आला. नुसता गोंधळ माजून राहिला होता.

स्टेजवर ढमढेरीणबाईंचा चेहरा नुसता पांढराफटक पडला होता. त्यांना कांहींच सुचत नव्हतं. मागच्या बाजूची स्त्रियांची मोहनमाळ खुर्चीतल्या खुर्चींत चुळबुळ करीत होती. अध्यक्षीणबाई घाम टिपीत होत्या. पुढें होऊन ढमढेरीणबाईंनीं हातवारे करून सर्वांना शांत करण्याचा प्रयत्न केला....आणि थोड्याच वेळांत त्यांना यश येऊन हॉलमध्यें मयाण शांतता पसरल्यासारखी दिसली. सर्वांचं लक्ष आतां स्टेजवर खिळलं.

....आणि पुन्हां चमत्कार घडला. उजव्या विंगजवळचं स्टेजवरचं एक छोटं दार फट्दिशी वर उघडलं गेलं. ढमढेरीणबाई चपापून दोन हात मागे सरल्या. बायकांची मोहनमाळ घाबरून उभी झाली... त्या दारांतून घूस–उंदीर न निघतां एक मेदरलेली आरोळी व पाठोपाठ माणूस बाहेर पडला. तो तरी कसा ? सर्कशींतल्या विदुषकालाहि साधणार नाहींत असें वेडे वांकडे हातवारे करीत !....हवेंत हातपाय झाडीत होता ! हरिभाऊच होते ते ! आणि देवा....मधमाशांचा लहानसा थवा त्यांच्या डोक्याभोंवतीं गुंजारव करीत होता.

क्षणांत स्टेजवर एकच गोंधळ उडाला. खुर्च्या उलट्या पालट्या झाल्या. टेबल लाथाडलं गेलं व त्याखालीं अध्यक्षीणबाईंच्या चष्म्याचा चुराडा झाला. एक दोघी जणी तर आपसांत टक्कर होऊन कोसळल्यासुद्धां !

हरिभाऊंना मधुन मधून चटके बसत तसे ते हवेंत उसळत. त्यांची शेंडी मोकाट सुटली होती. मधमाशा गुंजारव करीत वरचेवर झेंप घेत होत्या. कांहींनी आपण स्त्री पुरुषांत भेदभाव ठेवीत नाहीं हे दाखवण्यासाठीं स्त्री-समुदायावर आपला मोर्चा वळविला न् कांहींना चटके द्यायला सुरवात केली. हॉलमधल्या स्त्रिया बाहेर पडण्याची घाई करीत होत्या आणि बाहेर पडलेल्या आंत डोकावून स्टेजवरची गंमत पहात दारांत तुंबून उभ्या राहिल्या होत्या. नुसता गोंधळ माजून गेला होता....

सारं स्टेज आतां रिकामं झालं होतं. फक्त मध्यभागी हरिभाऊ तेवढे वेड्यावांकड्या उड्या मारीत होते; तेवढ्यांत पडदा पाडून त्यांच्या मदतीला धांवले त्यांच्या सभासदांपैकीं कांहींजण !

त्यानंतर बरेच दिवस गांवांत नव्या नव्या अफवा उठत होत्या. कोणी म्हणे भगिनीमंडळ मित्रमंडळावर कायदेशीर इलाज करणार आहे...कोणी म्हणत हरिभाऊ मित्रमंडळाचा राजिनामा देणार आहेत... तर कुणी सांगत ढमढेरीणबाई भगिनीमंडळाचं विसर्जन करणार आहेत. ढमढेरीणबाई दिवाळीच्या रजेंत गांवीं गेल्या आहेत व परस्पर बदलीची खटपट करताहेत....हरिभाऊ सर्व अंगाला न् तोंडाला कापूस लावल्यामुळें व पट्टया बांधल्यामुळें अक्षरशः ताबुतापुढील वाघासारखे दिसताहेत.

दोन्हीं मंडळाच्या वागण्याच्या पद्धतींत मात्र फरक पडला असून गांवांत आतां बरीच शांतता नांदत आहे. ढमरीणबाईंना या बाबतींत कुणीं विचारलं म्हणजे त्या नाक मुरडून फणकाऱ्यानं म्हणतात,

"जाऊं द्या हो ! कुत्र्याची नळी वांकडी ती वांकडीच. अहो मेली म्हण आहे नां 'कावळा कितीहि उगाळला तरी काळा तो काळाच' ......!"

● ● ●

# विश्वमोहिनी आणि फॉनचें अलगुज



## [ ऑस्कर वाइल्डची एक अप्रकाशित कथा ]

**एका** गांवांत एक माणूस होता. गांवकऱ्यांचें त्याच्यावर प्रेम होतें. कारण तो त्यांना गोष्टी सांगत असे.

दररोज सकाळीं तो बाहेर जायचा. संध्याकाळीं तो परत आला, कीं सगळा गांव त्याच्या भोंवतीं लोटावयाचा व त्याला म्हणावयाचा, "आज काय पाहिलंस ? सांग पाहूं आम्हांला."

आणि तो मग सांगत असे, "आज मी अरण्यांत रोमन शेतँकऱ्यांचा देव जो फॉन् तो पाहिला. तो अलगुज वाजवीत होता. अन् त्याच्या त्या सुरांवर वनदेवता फेर घालत नाचत होत्या."

"तूं आणखी काय पाहिलंस तें सांग" गांवकऱ्यांनीं त्याला विचारलं.

"मी समुद्र किनाऱ्यावर गेलों, तिथं मला तीन विश्वमोहिनी आढळल्या. त्या लाटांवर बसल्या होत्या. आपले हिरवे केस त्या सोनेरी फणीनं विंचरीत होत्या."

आणि लोकांचें त्यांच्यावर प्रेम होतें. कारण तो त्यांना गोष्टी सांगत असे.

एके दिवशीं सकाळीं तो नेहमींप्रमाणें गांवांतून बाहेर गेला. तो समुद्र किनाऱ्यावर गेला. तेथें त्याला तीन विश्वमोहिनी दिसल्या. त्या लाटांवर बसून सोनेरी फणीनें आपले हिरवे केस विंचरीत होत्या. तो तसाच पुढें निघाला. अरण्याच्या कडेवर आला. त्यानें पाहिलें, कीं फॉन् अलगुज वाजवीत आहे आणि वनदेवता त्या तालावर फेर धरून नाचत आहेत.

संध्याकाळीं तो गांवांत परत आला. नेहमींप्रमाणें गांवकरी त्याला म्हणाले, "आज काय पाहिलंस ?— सांग पाहूं आम्हांला.

तो म्हणाला, "मी आज कांहींच पाहिलं नाहीं."

या गोष्टीचें तात्पर्य तसें लक्षांत येणार नाहीं. त्याकरितां ऑस्कर वाइल्डनें अगोदर केलेली प्रस्तावना सांगितली पाहिजे. तो म्हणतो, 'जग एक नसून दोन आहेत, हें आपण लक्षांत घेतलं पाहिजे. एक जग असं असतं, कीं त्यासंबंधीं कांहीं सांगावंच लागत नाहीं. या जगाला "खरं जग" म्हणतात. हें जग पहाण्यासाठीं कांहीं सांगावं लागत नाहीं. दुसरं जग कलेचं होय. त्या जगासंबंधीं सांगावंच लागतं नाहीं तर तें मुळीं अस्तित्वांत येणार नाहीं."

निवेदक– **अ. सि. केळुस्कर**










# मॅडचॅप



आनंद घाटुगडे

*मला अक्कल हवी होती. सत्य हवें होतें. शांति हवी होती. अहिंसेचा शोध घ्यायचा होता. गांधींची अहिंसा—पण ह्या 'शहाण्या' जगांत ह्या 'मॅडचॅप'ला यापैकीं एकही वस्तु मिळाली नाहीं—कां ?*

**दुनिया** मला मॅडचॅप म्हणते.

मी म्हणतो, दुनिया एक हजाम आहे. पण घरच्यांना काय धाड भरलीय मला वाटेल तसे घालून पाडून बोलतात ते ? अरे म्हणजे आहे काय ! आई म्हणते, मी वायकोपुढं नंदीबैल आहे. वायको म्हणते, मी आईच्या ताटाखालचं मांजर आहे. आणि प्रत्यक्ष जन्मदाता म्हणतो, कीं दोन पोरं झालीं तरी गद्धयाला (म्हणजे मला) काडीची देखील अक्कल आलेली नाहीं

म्हणून एकदां मी कावलो, आणि तरातरा वाण्याच्या दुकानावर जाऊन म्हणालो,

" वाणीदादा, मला एक पावलीची अक्कल द्या !"

" काय द्या म्हणालात ?"

" अक्कल द्या ? अक्कल ?"

वाण्याचा गूळ झाला !

" अक्कल द्या म्हणून बोंबललो, पुडींत बांधून ?"

वाण्याच्या गूळ झालेल्या चेहऱ्यावर जरा संशय बळावला !

" हे बघा, तुमच्या मागण्यांत कांहींतरी गफलत होते आहे. कदाचित् तुम्हाला नवसागर नाहींतर कुजका गूळ हवा असेल . . मागल्या दारानं या !"

" नाहीं ! नाहीं !"—मी करसावून ओरडलो.

" ? "

" मला अक्कलच पाहिजे आहे, पावलीची. काडीभर-देखील नाहीं आहे माझ्याजवळ ती !"

" माफ करा ! आम्हीं अक्कल विकत नसतो !"

" पण कां नाहीं विकत तुम्हीं अक्कल ?"

" वाण्याचं दुकान आहे. तरी बाळंत काढा सुद्धा मागा तो देऊं. पण अक्कल मात्र मिळणार नाहीं !"

मला कोडें पडलें. हा वाणी सगळे विकतो. वेळप्रसंगीं कोडगेपणें लाजसुद्धां विकून नफा करतो. मग अक्कल कां विकत नाहीं बरें ?

पण कोडें पडलें, तेवढ्या झटकन तें उलगडलेंहि.

बरोबर आहे ! वाणी अक्कल नाहीं विकणार ! कारण मग त्याला तांदळांत गारेचे खडे मिसळून विकतां आले नसते. विकले तरी, गळ्यांत रुद्राक्षाची माळ घालून कपाळावर गंधाचे दुभोटी नाम ओढतां आले नसते !

ओठांओठीं नांवाचा जयकार होणाऱ्या आणि रोज सगळ्या पेपरांतून फोटो छापून येणाऱ्या, एका थोर पुढाऱ्याला भेटायला गेलो. तेव्हांहि असेच झाले.

परब्रह्म भेटल्याचा आनंद चेहऱ्यावर खुलवून, प्रथम मी त्या महापुरुषाला साष्टांग प्रणिपात घातला आणि मग पामरा-सारखा याचना करून म्हणालो.

" चरणापाशीं एक मागणें घेऊन आलोय् !"

" काय सेवा करूं ते बोला ?"

" सेवा कसली ? आपण थोर देशभक्त, सत्याग्रही, गांधींचे सच्चे चेले—"

" होय, मग ?"

" मला थोडं सत्य पाहिजे होतं. ही पिशवी बरोबर घेऊन आलोय्. फार नको, दीड ते अडीच किलो सत्य या पिशवींत घाला !"

मला वेड्यांत काढल्यासारखें पुढारी हंसले.

" मेहेरबान, सत्य असं मागून मिळत नसतं !"



अनुक्रमणिका

"मग कसं मिळतं ? मला वाटले कीं, लोकशाहींतल्या लोकमतासारखे सत्यदेखील मागून किंवा किमानपक्षी विकत मिळत असावे. द्यायची इच्छा नसेल, तर नका देऊं ! पण दाखवा. निदान मला तें पहायचं आहे !"

"ऐकलंत दादासाहेब, यांना म्हणे सत्य पहायचं आहे !–" आपल्या शेजारीं बसलेल्या कुण्या एका बड्या धेंडाकडे पहात पुढाऱ्यांनीं डोळे मिचकावले. आणि खादीच्या सुस्त लोडासारखे दिसणारे ते कुणी दादासाहेब देखील यावर बदामाच्या राजासारखे मस्त गुलगुलीत हंसले.

तरी देखील नाराज न होतां आग्रहानें मी बोललो.

"पण मी म्हणतो, असं कां ? सत्य निदान दुसऱ्याला दाखवायला तरी तुमची कां हरकत असावी ?"

"माझी कांहींच हरकत नाहीं. पण सत्य तसें दाखवतां येत नाहीं. आणि पहातांहि येत नाही !"

पुढारी सगळ्या देशाची काळजी वहातात ! कबूल, पण या वेळीं मात्र ते ढोंगी बोलले. त्याच्या कडक इस्त्रीच्या टोपीखाली, सुटलेल्या थुलथुलीत ढेरीमध्यें आणि आपल्या साथीदाराकडे पाहून डोळे मिचकाविण्यांत . . . यांत सगळ्यांत कुठेतरी पुढारी महोदयां-जवळचे सगळे सत्य लपलें होतें. मला स्पष्ट ओळखूं आले. पण त्यांची इच्छा दिसली नाहीं, तेव्हां मीदेखील फारसा आग्रह ताणला नाहीं. सत्याला कलाटणी दिली.

जिकिरीला आल्यासारखा विचारतां झालो.

"सत्य नाहीं, तर निदान मला शांति कुठं मिळेल तेवढं तरी सांगा !"

"कुठली शांति ?"– शेपटीवर पाय पडल्यासारखे पुढारी फुसफुसले.

"शांति ? ती सत्य अहिंसेमधली शांती ?"

"ती शांति होय ? पुढारी निवळले, "मग ती पाहिजे तर मिळेल !"

"कुठं मिळेल ?"

"तुम्ही असं करा. माझ्या बंगल्याकडं आत्ता आलात त्याच वाटेनं परत सरळ जा. पुढं लष्करी चौकी लागेल. . . तिथं चौकशी करा !"

मी त्या राखी निळ्या रंगाच्या चौकीपाशीं पोहोंचलो न पोहोंचलो येवढ्यांत कुठुनसा एक आडमाप सोजीर उपटला आणि बेगुमानपणें माझ्या छातीला संगीन टोचल्यासारखी करून, गुरगुरला.

"कोण आहेस तूं ? आणि अशा अवेळीं हिकडं कुठं घोटाळतो आहेस ?"

"म्–म्–मीं–मला शांति पाहिजे आहे ?"

"कुठली शांति ? ती कोरगांववाली शांती ? तिला अटक झाली होती . . . पण समोरच्या बंगल्यांतल्या त्या सायबांच्या सांगण्यावरून तिला सोडावे लागले . . . तूं तिचा कोण ?"

"म्–मी तिचा कुणी नाहीं. मला ती शांति नको. स्–सत्य अहिंसावाली शांति पाहिजे आहे ?"

"म्हणजे ती येशू ख्रिस्ताची, गांधींची, केनेडींची शांति ?"

"होय, तीच !"

"ठीक आहे !"– पोलाद फुटल्यासारखा सोजीर हंसला. आणि वरची धारेदार संगीन काढून घेऊन बंदुकीची दुनळी माझ्या डोळ्यांत खुपसल्यासारखी करून त्यानें हुकूम दिला.

"यांत पहा, म्हणजे तुला ती शांति दिसेल !"

"मला तर या नळकांड्यांत नुस्ताच अंधार दिसतो खोल बुडुक !"

"दिसतो ना अंधार ? मग तीच शांति. याच अंधारांतून एकाएकी भडकून ठिणगी बाहेर पडते. आणि ती वरीक माणसाच्या छातींतून आरपार झाली कीं, त्याला कायमची शांति मिळते...... मग बोल हवीय् तुला ही शांति ?"

तीच दुनळी माझ्या छातीवर रोखीत, बंदुकीच्या घोड्यांत बोट अडकवून सोजीरानें सवाल केला. . .

टराटरा फाटत मी म्हणालो––

"नको ! नको ! मला असली शांति नको. ही हिंसा झाली. मी गांधींच्या अहिंसावादाचा भोक्ता आहे !"

"हूं !"– उपहास आणि तुच्छता यांचें बेमालूम मिश्रण करीत सोजीर सांगूं लागला. "अहिंसा हे शेळीचें तत्त्वज्ञान आहे, शूरांचे नव्हे !"

"तें कसें ?"

"भुकेजल्या सिंहाच्या तावडींत सांपडल्या कीं चतुर शेळ्या बहुधा हें अहिंसेचें तत्त्वज्ञान त्याला शिकवतात !"

" ? "

"हें अहिंसेचें तत्त्वज्ञान सिंहानें पटवून घेतलें नाहीं तर शेळ्यांना जिवानिशी मरावे लागते. आणि पटले तर शेळीची कातडी बचावते . . . पण सिंहाला मात्र कदाचित् भुकेनें उपाशी-पोटीं मरावे लागते ! . . . "

"बापरे !"

मी गिधाड बघितलेल्या कोंबडीच्या पिलासारखा सोजीराला बिचकलो आणि सैरावैरा धांवत सुटलो. वाट फुटेल तिकडे धांवत सुटलो. सोजीरापासून शक्य तितक्या लौकर, शक्य तितक्या दूरवर जावे, म्हणून मी तंगड्या फाडूं लागलो . . .

. . . पळतां पळतां कसा आणि कुठे पोहोंचलो हें कळले नाहीं. पण पुनःपुन्हा मागे वळून पहात, पुढे धांवत असतांना ज्याला धडकलो तो नेमका जगन्नाथ ड्रायव्हर निघाला.

"क्यूं दोस्त ! आज इकडे कुठे चुकलास ?"

टपरीवर पानाचा रंगदार विडा खात उभा असलेला जगन्नाथ हिरव्या माडीवरची नजर थोडी माझ्याकडे वळवीत म्हणाला,

"जगन्नाथ, बकोट सोड ! मला यावेळीं गडबड आहे !"

"वा भै ! गडबड आहे वो ठीक है ! पण कुठल्या माडीवर ?"

"आणि मी रागावलो देखील आहे. उगीच चावटपणा करूं नकोस ?"

"रागावला आहेस ? बहुत अच्छा ! पण कुणावर ?"– माझा पिच्छा तरी पुरवून जगन्नाथानें सवाल केला.

"कुणावर म्हणजे ? सगळ्या जगावर. अरे, म्हणजे आहे काय ? एवढा गांधीचा देश . . . पण तिथं सत्य मिळत नाहीं. अहिंसा मिळत नाहीं. शांति मिळत नाहीं. वाण्याच्या दुकानांत गेलो तर अक्कल सुद्धा विकत मिळत नाहीं !"

"यार, मग अगोदर मला येऊन सांगायचं नाहींस ?"

"कां ?"

"हे तमाम जिन्नस तुला मी पुरवले असते . . . अभी चाहता है ?"

"जरूर !"

"फिर चल माझ्या खोलीवर !"

एका गलिच्छ अंधेऱ्या बोळांतून चांचपडत जगन्नाथावरोबर मी त्याच्या खोलीवर पोहोचलो. खोली उघडून दोघेहि आंतल्या ओल्या कुबट अंधारांत तसेच आपले फतकल मारून बसलो. मग कुठल्यातरी काळोख्या सांद्रींत हात घालून जगन्नाथानें एक शिस्या-एवढी बाटली आणि कपाटांतले दोन कांचेचे ग्लास बाहेर काढले. बाटलींतलें द्रव तीन बोटापर्यंत दोन्ही ग्लासांत भरून ओतले. आणि एक ग्लास माझ्या हातांत देत म्हणाला,

"हें पी ! म्हणजे तुला शांति मिळेल ! आणि हळु हळु सत्याचंहि दर्शन घडूं लागेल !"

"आणि अहिंसा ?"

"लेका, या पिण्याच्या क्रियेलाच अहिंसा म्हणतात . . . समजलास ?"

"समजलो !"

"मग पी तर मुकाट्यानं ?"

मी मुकाट्यानं प्यालो. घशांतून छातींत खालपर्यंत जळजळ उतरत गेली. मी ग्लास मोकळा करून खाली ठेवला तेव्हां जगन्नाथनें दोन ग्लास मारले. आणि माझा ग्लास दुसऱ्यांदा अर्धा भरून, स्वतःचा ग्लास पुन्हा तिसऱ्यांदा भरून घेतला.

एकून, माझा दीड ग्लास आणि जगूचे तीन ग्लास एवढ्या-वर मामला थांबला . . . आणि हळूहळूं लाडांत येत, जगू मला साद देऊन म्हणाला,

"हॅलो, माय डीयर राजकपूर !"

"जगू, फाजीलपणा नको ! मी राजकपूर नाय . . . वैजयंतीमालापण नाय !"

"मग कौन है वे ?"

"मी घ्–घाटगे हाय !"

"ह्–हॅलो, वाटवे ?"

"नो वाटवे . . . मी घ्-घा-ट-गे !"

"म्हणजे तूं घाटगे आहेस ?"

"होय !"

"अरेरे, वाईट झालं !"

"वाईट झालं ?"

"ईश्वर त्-तुझ्या आत्म्याला शांति देवो ! फ्-फार वाईट झालं !"

"काय वाईट झालं ?"

"ह्-हेच ! तूं घ्-घ्-घाटगे व्हायला नको होतं . . ."

"म्-मग कोण होऊं ?"

"क्-केनेडी . . . केनेडी हो !"

"केनेडी ?"

"होय–केनेडी !–" उचकी देऊन जग्या बोलला आणि मी विजेचा झटका बसल्यासारखा भेलकांडत त्याच्यापासून दूर झालो. अत्यंत सावध पवित्रा घेत त्याला विचारतां झालो.

"ज्-ग्-गजन्या ?"

"क्-काय ?"

"त्-तूं जनता–विनता आहेस काय रे ?"

"ज्-जनता ? ही कसली जनता वे ?"

"जनता माहीत नाहीं तुला ? बडी चलाख - होशियार असते ही जनता . . . . . ती दुसऱ्याला येशू ख्रिस्त हो म्हणते. महात्मा गांधी हो म्हणते. केनेडी पण हो म्हणते. मग म्-मारे त्याला अध्यक्ष काय करते ! त्याचा जयजयकार काय करते ! त्याच्यावर कौतुकाचा आणि स्नेहाचा वर्षाव करीत उघड्या मोटारींतून त्याची मिरवणूक काय काढते . . . . . आणि तुला सांगतो जगन !"

"स्-सांग ! सांग !"

"जनतेच्या या आलोट मायेनं हरकून जव ये मासूम केनेडी तान्ह्या लेकराच्या भावड्या विश्वासानं जनतेच्या कुशींत शिरायला जातो ना, तेव्हां . . . तेव्हां पाठीमागून सातव्या मजल्यावरच्या खिडकींतून गोळी चालवून ती त्याला ठार करते. पत्ता सुद्धा लागं देत नाही."

"हाय ! जन्ता भी क्या जन्ता है !"

"अरे, नुस्ती त्याला ठार मारून शरमेनं मान खालीं घालून गप्प बसत नाहीं. वर पुन्हा आमचा दुसरा अब्राहम लिंकन गेला हो ! गांधी महात्मा गेला हो ! म्हणून हेल काढून रडते . . . असली बिनबुडाची आहे ही जनता . . . म्हणून विचारतो तूं जनता बिनता तर नाहींस ?"

"नाय बाबा ! आपुन तर नाय ! तूं आहेस ?"

"म्-मी ? नाय ! नाय ! मी जनता नाय आणि केनेडी पण नाय !"

"फिर यार, ये जनता को मारो गोली !"

बोटांत बोटे अडकवून मी तिची पिस्तुल केली आणि ठो ठो करून जनतेला गोळी मारली–आसुरी समाधानानं, रक्त घोटल्या-सारखा जगन्नाथ खदखदा हंसला. मी पण चेकाळलो . . .

—आणि दुसऱ्याच क्षणीं एकमेकांच्या गळ्यांत गळा घालून आम्ही धाय मोकलून रडूं लागलों !

•••

अनुक्रमणिका








# विठ्याचा न्याय

—जनार्दन सातव

*सारं पाहलंय्. सारं भोगलंय् ! आतां फक्त मरण हवंय् पांडुरंगा ! फक्त मरण !! तें तुझ्या पायाशीं यावं ही एकच आस धरून मी इथवर चालत आले, चाळीस वर्षं चालत येते आहे—*

*—आणि विठ्ठलानें मरण दिलं !*

**दिंडी** पंढरपुराच्या दिशेनें निघालीय्. पावलं लयबद्ध आहेत, उत्सुक आहेत. ज्येष्ठी एकादशी पुण्यांतल्या गुडदाणीवर सजली, बारस सासवडीं, कऱ्हेच्या कुशींत सुटली. मग जेजुरी, निरा, लोणंद, तरडगांव, फलटण अशी गांवं करीत करीत दिंडी पंढरीजवळ येवून ठेपलीय्.

रांगड्या गळ्यांतून घुमणाऱ्या अभंगांना भक्तिभावाचा सुगंध विलगलाय्. पहांट गारवा भेदून उंचावणारे उबदार स्वर वावरांतल्या ढेकळांवर रुजलेले रोमांच झडवताहेत. आर्ततेनें झाडांच्या पानांवर आर्द्रता पाझरतेय्. शें-दीडशें कंठांतल्या आवाजांची पेडं गुंफून आळवणीची वेणी सुरेख जमलीय्. झाडांझुडपांवर, दगडधोंड्यांवर सळसळत पुढें सरकत निघालीय्. मृदुंग खणखणित बोलतोय्. टाळचिपळ्यांनी कहर मांडलाय्. पताका वाऱ्यावर नाचताहेत. विठ्ठलनामाच्या गजरांत डुलताहेत.

आणि सर्वांत शेवटीं खुरडत येतेय् एका देहाची थरथरती धनुकली. दातांची मिरासदारी संपलीय्. पांढऱ्या केसांत काळं म्हणून नखाएवढं नाहीं, अशी म्हातारी. कणा वांकला इतकी जख्ख. गोपीचंदनाच्या सफेद टिळ्यावर अबिराचा काळा ठिपका, चंद्राच्या वक्षावर विसावलेल्या काळ्या ढगासारखा. गळ्यांत तुळसीची माळ हिंदकळतेय्. डोईवर पितळी तुळसीवृंदावन डुगडुगतंय्. तें छोटसं वृंदावन आज कित्येक वर्षं अशीच पंढरीची वारी करतंय्, डोईवर बसून.

कुणीतरी मध्येंच जवळ येत विचारतं.

"म्हातारे, दमलीस वाटतं ? बरीच चाल झालीय मघांपासून. सामानाच्या गाडींत जाऊन बस जा..."

म्हातारीच्या चेहऱ्यावरच्या सुरकुत्यांत सांठलेले श्रम क्षणभर निपटल्यासारखे भासतात. उसन्या उत्साहानें ती कुरकुरते.

"देवाला जायचं ते गाडींत बसून ? खुळा आहेस... गादीवर बसून तो भेटत नाहीं, कष्ट पाहिजेत त्याला. जोपर्यंत त्यानं पायातलं बळ—"

"म्हातारे, जिद्द करूं नकोस, नुसतं हो म्हण. उचलून गाडींत बसवतो."

"नाहीं, नाहीं पुता. तुझ्या पाया पडते, तेवढं करूं नकोस. माझ्या कष्टांवर पाणी ओतूं नकोस... अरे, आतापर्यंत विठ्ठलानं माझं ऐकलं नाहीं म्हणून हें तप, हा प्रपंच."

"म्हातारे, ऐक माझं–" दिंडीतून उमटलेल्या एकनाथांच्या गाऱ्हाण्याच्या गजरांत त्या माणसाचा विरोध बुडून जातो.

"परिमळ गेलिया ओस फूल देठी...
आयुष्या शेवटी। देह जैसा....
घडिघडी काळ वाट याची पाहे
अजून किती आहे। अवकाश......

होय, परिमल संपलाय् केव्हांच. निर्माल्य अडकलंय् देंठावर..... गळून पडायची वाट पहातंय्.... आतां मरण पाहिजे मला. केव्हांहि पाठव त्या यमाला. मी तयार आहे, वाट पहातेय्... पण थांब.. एक अट आहे, विनंती आहे. मरण हवं पंढरीच्या वेशीआंत, तुझं नांव आळवतांना, तुझं रुपडं आठवतांना. बस्स्, एवढंच हवं. चाळीस वर्षांच्या हेलपाटाचं, वाऱ्याचं सार्थक होईल........

सहा वर्षांची असतांना हळदीनं पिवळी झाले मी. चोळीच्या बाहींतून कोंपर दिसत नव्हतं. डोईवरचा पदर नाकावरून मागं सरत नव्हता. कुंकवाचा टिळा तर रुपयासारखा. गोठपाटल्यांनीं भरल्या हातांनी सासुसासऱ्यांचे पाय शिवले मी. जोडवी भरल्या पायांनीं मापटं उधळून एका भरल्या घरात शिरले. कष्टांची पर्वा केली नाहीं कधीं.





अनुक्रमणिका

पायली–पायलींच्या भाकरी वडवल्या. चारचार हंडे वागवतांना मानेचा कांटा ढळवला नाहीं कधी. पंधरा वर्षं अंगभर कष्ट आणि पोटभर खाणं याशिवाय दुसरं कांहीं माहित नव्हतं मला. सासूसासऱ्यांच्या मागें घराचा भार माझ्या शिरावर आला, बरोबर लक्ष्मीहि आली. सुखी होतें मी.

अन् मग तूं लीला दाखवायला सुरुवात केलीस देवा. वारदाना वाढला होता, धन्यांची पंगत दररोज दहापंधरा पानांनी सजायची, अडल्यापडल्यांची गरज भागायची. गांवचे कज्जेखटले तुटायचे धन्यांच्या शब्दां-वर, नजरेच्या जरबेवर. पण तुला परीक्षा घ्यायची होती. परिस्थिती अवघड आणलीस. एका वर्षी.........

पावसानं काळं केलं त्या वर्षी. रोहिणीनं वळव वाळवला. मृग कठोर झाला. पाण्याची टिपं माणसांच्या डोळ्यांत उमटलीं पण आकाश कोरडं होतं. पेरण्या मरगळल्या. आर्द्रा शुष्का ठरली आणि शेतकऱ्यांच्या पोटांत गोळा उभा राहिला. दुष्काळाची पावलं जागोजाग उमटूं लागली. पावसानं तोंड फिरवलं. तसे वीस वीस परसांच्या विहिरींत खडक उघडे पडले. हिरवं म्हणून जेवढं होतं तेवढं चटाचट नाहींसं व्हायला लागलं. माणसांचीं पोटं पाठीला लागली. जित्राबांची हाडं निघालीं. दिवसा दोन-दिवसांआड एकेक जनावर हातपाय लांब करायला लागलं तसा हाहा:कार उडाला. माणसं गांव सोडायला लागलीं.

धनी चिंताक्रान्त होते. गांवाचा भार शिरावर होता त्या गावांत पहिला भूकबळी पडला त्या दिवशीं शें-दीडशें माणसं आमच्या दारासमोर ताटकळत होतीं, रडत भेकत म्हणत होतीं.

"धेवा, म्हारवाडा उपाशी मराया लागलाय्. तुमच्याशिवाय आमाला वाली नाहीं. रस्ता दावा ह्या ईतभर खळग्या मरायचा. न्हाईतर ईख द्या तुमच्या हातानं...." सहनशीलतेला तडा गेला. तसे धनी ताडकन् उठले. कुऱ्हाड घेऊन कणगीकडे निघाले. 'एक, दोन, तीन... पुरुष दीडपुरुष उंचीच्या कणग्यांवर खपाखप कुऱ्हाडीचे घाव पडले. आणि कणग्यांच्या भेगांवाटे सरसरत्या धान्याचे ओघ धरणाच्या पाण्यासारखे जमिनीवर कोसळले. दाण्यांची रास लागली. मागें वळून धनी शांतपणें उद्गारले "लुटा, हवं तेवढं न्या....."

आणि तासभर नुसती झुंबड लागली. गायगरीबं संतुष्ट झाली, दुवा देत नाचूं लागली. पायावर कोसळणारी डोकी दूर लोटतां लोटतां धन्यांना नकोसं झालं. डोळ्यांना खळखळत्या धारा लागल्या. अन् यावेळींच देवा, माझ्या उचंबळत्या मनांत पहिल्यांदा विचार डोकावला. सुखांत ओतप्रोत बुडाले. त्यांतून वर यायची इच्छा नव्हती. असं तेजस्वी कुंकू कपाळी असतांना मरण यावंस, अहेवपणी मरण यावंस अशी इच्छा धरली, असं गाऱ्हाणं मनांत ठेवलं........

दिंडी हळूं हळूं सरकत असते, गोगल-गाईच्या गतीनें.

दिवस डोक्यावर येतो तसा वाटेंतल्या एका गांवांत मुक्काम पडतो. गांवकऱ्यांची धांदल उडते. पाय धुवायला पाणी येतें. भाकरींच्या दुरड्या येतात. कोरड्यासांची पासेली येतात... पाया पडणें होते, आलिंगनें होतात, विठ्ठलनामाचा गजर होतो.... आणि मग उन्हं उतरतांना दिंडी मार्गाला लागलेली असते.

शरीरं दमलेलीं असतात, पाय आंबलेले असतात पण आतां जवळ येत चाललेल्या पंढरीची ओढ सारं विसरायला लावते. सोपानदेवांचा अभंग सुरूं असतो.

आम्ही नेणो काया, नेणो गा ती माया ।<br>
ब्रह्मी ब्रह्म लया । आम्हांमाजी......<br>
सोपान हा ब्रह्म, वर्ततसे सम ।<br>
प्रपंचाचा भ्रम । नाही नाही......

"आजीबाई, मागं काय रेंगाळताय्, पाय उचला लवकर–" ती चमकून मानावर येते "दमला असाल तर गाडींत बसा. पावसाचा रंग दिसतोय...."

उत्तर न देतां, विठ्ठल विठ्ठल करीत ती पाय उचलूं लागते.

सांवल्या लांब लांब होत जातात. आकाश मळभून येतं, अंधारायला लागतं. भजनांचा वेग मंदावतो.

कुठंतरी चुकार घुबड घूं घूं करतं. तिच्या सरावलेल्या कानांवर तो अस्पष्ट घुत्कार येतांच ती दचकते.

असंच घुबड ओरडलं होतं त्या रात्रीं. मयाण, ती फत्तरकाळजांच्या काळजीनें काळवंडलेली रात्र. माझा कुंकवाचा टिळा रक्तानें धुणारी रात्र. कांटा फुलतो अजून अंगावर ते आठवलं कीं—



'मला 'हें' समजायला लागेल कीं काय, याचीच भीति वाटते"

## वारसा !

लहानपणापासून अतोनात कष्ट करून धर्मदासनीं अपरंपार संपत्ति मिळविली; तसाच दानधर्मंहि पुष्कळ केला.

वानप्रस्थाश्रमांत प्रवेश करण्यापूर्वी त्यांनीं आपल्या चौघा मुलांना बोलावले आणि प्रत्येकाला आपल्या संपत्तीचा एक चतुर्थांश भाग दिला.

थोरल्या तीन मुलांचे चेहरे आनंदानें उजळले. सर्वांत धाकटयाची मुद्रा तेवढी गंभीर दिसली.

धर्मदासना वाटले. धाकटयाला इतरांपेक्षां अधिक हिश्शाची अपेक्षा असावी. त्यानीं विचारले.

"बाळ, तुझा भाग तुला कमी वाटतो काय ? "

"नाहीं पिताजी" सद्‌गदित आवाजांत धाकटा म्हणाला, "संपत्तीचा एवढा सुध्दा भाग मला नको. मात्र आपल्या कर्तृत्वाचा एक शतांश वारसा मला मिळाला तरी मी स्वतःला धन्य समजेन ! "

—र. कृ. चिंचलीकर

दरोडा अचानक आला होता. वेळ साधून आला होता. वाकळ खालवर पांघरून मी माजघरांत झोपलें होतें. निर्धास्त मनानें. धनी सोप्यावर झोपले होते. अंधारांतून भुतासारख्या उपटलेल्या आडदांडांनीं माणसं घेरली. गळयांतल्या सरीला हिसका बसला, जागी होते तोंच गळयाशी फरशी लागली. धन्यांच्या उशापायथ्याशीं चौघेजण होते. प्रसंग जीवावरचा होता. पण धन्यांना इपरीत आठवलं. नको ते केलं. जीवावर उदार होऊन त्यांनीं बोंब ठोकली तशा वीजेच्या वेगानं फरश्या उगारल्या गेल्या. मला ब्रह्मांड आठवलं. आतां जगायचं कुणासाठीं, कुणाच्या आधारानं...? घसरा पडलेल्या दोराशीं लोंबकळत होतें मी. तुटायला आला तरी तो आधार सोडून कां मागणार होतं ? आधार माझा एकटीचा नव्हे तर गांवाचा सुद्धां. तीरासारखं झेपावून मी धन्यांना कव घातली. फरशा हवेंतच थबकल्या. घाव झेलायला मी तयार होतें. पण माझं पांघरूण धन्यांसाठीं दुबळं ठरलं. गोघडी फेंकावी तसं मला ओढून बाजूला फेंकलं गेलं. अन् मग कचाकच दोनचार घाव पडले, घुसमटली किंचाळी हृदयाचा थरकांप करीत उमटली. रक्तानं भुई लाल झाली. हरी, हरी विठ्ठला उघडया डोळयांनीं तो सर्वनाश पहाणं नशिबी आलं रे. आणि त्यावेळीं मी देवा, तुला पुन्हां मरण मागितलं, तळतळून मागितलं होतं. पण तुझ्या काळजावरचा दगड हलला नाहीं. चांडाळणीचं जिणं जगायला मला मागे ठेवलं......

आतां पंढरी जवळ येतेय्. कळस दिसायला लागलेत. दिंडींत उत्साहाचं उधाण शिरलंय्. म्हातारीचं हृदय उचंबळतंय्.

पंढरपूर,

पुंडलिकानं सोपी केलेली वैकुण्ठाची पाऊलवाट.

तें महातीर्थ.

चंद्रभागेच्या कवेंत विसावलेलं वैष्णवी साम्राज्य.

जिथल्या तृणांतृणांत, पाषाण पाषाणांत, देवत्व, केवळ देवत्व वसलंय् अशी पंढरी. जिथं माध्यान्हकालीं समस्त तीर्थ पुंडलीकचरणीं—

विसावतात अशी पंढरी

उदंड देखिलें, उदंड ऐकिले, विशेष वर्णिले, थोर थोर.

—उदंडाची कीर्ति, गाईली पुराणीं, निर्धार वेदांनी केला ज्यांचा ऐसा देव, ऐसे संत, ऐसे क्षेत्र माझ्या दुबळया कुडीला उदरांत घ्यायला जवळ येताहेत. बस् हेंच, हेंच सार्थक.......

बुवांच्या धारदार स्वरांनीं अभंग तोललाय्, मृदंगाच्या थापेवर, टाळांच्या ठेक्यावर उंचावलाय्.

आमुची मिरास पंढरी, आमुचे घर भीमातीरीं......

पण देवा, हें काय, कशाला हें स्वागत, मला क्षुद्रेला हवेत कशाला हे सोस ?

हा जीवनधारांचा वर्षाव, हा अमृतकुंभाचा अभिषेक.

हा मेघांचा गडगडाट,

चपलेच्या कडकडत्या प्रकाशाचे तेजोमय दीपस्तंभ.

स्वागताला, मार्ग दाखवायला कां रे हें सारं ?

मी पदभ्रष्ट होईन म्हणून, वाट चुकेन म्हणून ?

अरे, उणीपुरी चाळीस वर्षं तुडवलीय् ही वाट. पायांत रुळली माझ्या. दृष्टी कमी केलीस तरी येतेय् नां मी. वेडा रे वेडा....

आणि पंढरीची वेस दिसूं लागत नाहीं तोंच ते अघटित, अकल्पित घडतं. काळीकाळाचा वेग तरी किती अतर्क्य ? लहर तरी किती अवखळ ? आकाशांतून सणाणत कडकडत निघालेल्या वीजेला इवल्याशा तुळसीवृंदावनाचा मोह पडावा ? थरथरत्या शीर्षांतून जळजळत गेलेल्या पेटत्या मेखेनं वृद्धेची दुर्बल कुडी भूमीशीं एकरूप केलीय्. पंचप्राण हिरावून घेतलेत.

चाळीस वर्षांच्या तपस्येचं फळ हे असं. उरीकटी वागवलेल्या आशेचा हा कोळसा. मागून मिळालं तें मरण, पण पंढरीच्या वेशीबाहेर.

हा विठ्याचा न्याय. ही कराल कृतघ्नता. कोण विचारणार या वंचनेचा, पापाचा जाब ?

●●●



मराठीचा विकास: महाराष्ट्राचा विकास






# भूतलावर स्थिरावलेल्या देवांगना

**चित्रकार** भय्यासाहेब ओंकार

**जेव्हां शिल्प सजीव होतें, दगडांना वाचा फुटते, कणाकणांत चैतन्य स्फुरतें तेव्हां — स्वर्ग धरेवर धांवत येतो.**

**एकदां** स्वर्गातल्या गंधर्व, अप्सरांनी देवेन्द्राला विनंती केली कीं, "स्वर्गातल्या अमृतपानाचा आणि स्वर्गातल्या नंदनवनाचा आम्हांला अगदी वीट आला आहे. आम्हांला कांहीं काळ पृथ्वीवर वास्तव्य करण्याची परवानगी द्या. तिथल्या सुखदु:खाचा आम्हांला अनुभव घेऊं द्या." गंधर्व, अप्सरांच्या या विनंतीला मान्यता देणें देवेन्द्राला जड वाटूं लागलें. त्याला चिंता वाटूं लागली कीं या स्वर्गांगना पृथ्वीवरच्या माणसांच्या नजरेस पडल्या तर पृथ्वीवरचीं माणसें त्यांच्या चरणीं लागतील. पृथ्वीवरचें वातावरण या देवांगनांना रुचलें तर त्या तिथेंच मुक्काम ठोकतील आणि स्वर्गाचा त्यांना विसर पडेल. पण त्या साऱ्यांच्या हट्टापुढें देवेन्द्राचें कांहीं चालेना. अखर देवेन्द्रानें त्यांना सांगितलें कीं, "तुम्हांला मी फक्त एक रात्र पृथ्वीवर रहाण्याची संधी देतो. एका कोजागिरी पौर्णिमेच्या रात्रीं तुम्ही पृथ्वीवरच्या कोणत्याही एका रमणीय वनश्रींत विहार करा. मात्र हें ठिकाण पृथ्वीतलावरील मनुष्यवस्तीपासून दूर असायला हवें आणि दुसऱ्या दिवशीं सूर्य उगवायच्या आंत तुम्ही परत स्वर्गांत हजर व्हायला पाहिजे. या अटी जर तुम्ही पाळल्या नाहींत तर मात्र माझ्या शापाला तुम्हांला बळी पडावें लागेल."

स्वर्गींच्या गंधर्व, अप्सरांनीं ही अट मान्य केली आणि एका कोजागिरीच्या रात्रीं त्या पृथ्वीवर उतरल्या. चंद्राच्या रुपेरी किरणांनी गिरिशिखरें न्हाऊन निघत होतीं. पारिजातकाच्या पुष्पांचा परिमल वातावरण धुंद करीत होता. गिरिशिखरावरून उड्या घेत येणारे छोटे निर्झर खालच्या नदीच्या जलप्रवाहांत मिसळत होते. स्वर्गाहूनही मर्त्यलोकीचें तें वातावरण अधिक आकर्षक होतें. त्या दरींत ओळीनें कितीतरी गुहा होत्या. ज्याला जी रुचेल ती गुहा त्यानें निवडली. कुणी नाचूं लागले. कुणी गाऊं लागले. कुणी सुरापान करूं लागले. पृथ्वीवरच्या मानवी जीवनांतल्या साऱ्या सुखदु:खाचें आकंठपान करण्यांत तें स्वर्गीय जीव देहभान विसरून गेले.

पहांट झाली. रविकिरणांनी बाहेरच्या गिरिशिखरांना स्पर्श केला. तरी त्या स्वर्गींच्या गंधर्व, अप्सरांना याचा पत्ता नव्हता. देवेन्द्राचा संताप शिगेला पोंचला आणि त्यांच्या तोंडून शापवाणी बाहेर पडली, "माझी अवज्ञा करणाऱ्या गंधर्व, अप्सरांनो, तुम्ही जिथें जशा असाल तशाच तिथें स्थिर व्हाल."

आणि मग या शापानें त्या गुहेंतील चैतन्य-मय वातावरण एकदम चेतनारहित झालें. नृत्यासाठीं उचललेलें नर्तिकेचें पाऊल जसेच्या तसेच अधांतरी स्थिर झालें. मदिरापानासाठीं उचललेला प्याला जशाचा तसाच हातांत राहिला. केशभूषा करीत असलेल्या अप्सरेच्या हातांतला आरसा तिला परत खालीं ठेवतां येईना. या गोष्टीला हजारो वर्षे लोटलीं तरी ते गंधर्व आणि त्या अप्सरा अजून तशाच अचेतन स्थितींत माणसांना पहायला मिळतात—हे शापीत गंधर्व अणि अप्सरा म्हणजेच अजिंठ्याच्या लेण्यांतून चित्रबद्ध झालेल्या सुंदर आकृति होत !

—अजिंठ्यांतल्या चित्राकृती संबंधी सांगण्यांत येणारी ही एक प्राचीन दंतकथा आहे. ही दंतकथा काल्पनिक आहे हें आवर्जून सांगण्याची गरज नाहीं. पण कैक वेळा सत्यापेक्षां काल्पनिक कथा अधिक मोहक असते. किंवहुना त्या कल्पितांत जें सत्य सांठवलेलें असतें तेंच मनाचा एक प्रकारें वेध घेतें. अजिंठ्याच्या चित्रासंबंधींची ही कथा काल्पनिक आहे हें माहित असूनहि वारंवार आठवावीशी वाटते आणि मनांत येऊन जाते कीं ज्या कोणा कथाकाराला ही कथा सुचली असेल त्याची प्रतिभा खरोखरीच अलौकिक आहे. कारण या कथेनें दोन हजार वर्षांपूर्वी अजिंठ्यांतील चित्रें रेखाटणाऱ्या महान कलावंताच्या कलागुणांचा गौरव फार मार्मिक तऱ्हेनें केला आहे.

मानवी जीवनांतले कितीतरी साधे क्षण अजिंठ्यांत साकार झाले आहेत. दाराशीं उगीचच उभी राहून भोंवतालच्या शेजाऱ्यांचें लक्ष वेधून घेणारी एखादी सुंदरी येथें दिसेल. तन्मयतेनें गोष्टी ऐकतांना एखादी अल्लड तरुणी आपल्या केसांच्या बटांशीं खेळ खेळतांना आढळेल. दासीच्या ताटांतील लाडवावर चोरून ताव मारणारा एखादा चोर इथें दृष्टीस पडेल. मानवी जीवनांतल्या अशा कितीतरी छोट्या गोष्टी सूक्ष्म निरिक्षणानें अजिंठ्याच्या कलावंतांनीं रंगवल्या आहेत. जगांतले नित्याचे विषयच इथें साकार झाले आहेत. पण असें असलें तरी इथल्या आकृतींना कांहीं निराळा गोडवा आहे. इथल्या मानवी आकृति जणूं स्वर्गाच्या मुशींतून बाहेर पडल्या आहेत. भूतलावरचेच वातावरण पण त्या वातावरणाला स्वर्गीय कांति लाभली आहे. याचें कारण हेंच कीं अजिंठ्यांतल्या चित्रसृष्टीचा स्थायीभाव 'सौंदर्य' हाच आहे. इथली सुखें आणि दुःखें सारी सौंदर्यानें नटलीं आहेत. रुष्ट झालेली स्त्री जणूं सौंदर्याचाच एक निराळा आविष्कार दाखवीत आहे. घाबरून तोंडावर हात ठेवलेल्या स्त्रीचीं बोटेंही जणूं सौंदर्याची निराळी अनुभूति देत आहेत. इथल्या नक्षीकामांत काढलेले म्हशींचे आकारही जणूं लावण्याचा निराळा साक्षात्कार घडवीत आहेत. संध्याकाळच्या रम्य सूर्य किरणांमुळें सारी सृष्टी सौंदर्यानें न्हाऊन निघावी तद्वत अजिंठ्यांतील कलावंतांच्या प्रतिभेनें मानवी जीवनांतले सारे भाव रस, अणि सृष्टींतील साऱ्या स्थिरचरवस्तू स्वर्गीय सौंदर्याचें लेणें ल्याल्या आहेत.

कल्पित दंतकथा सोडून दिली आणि संशोधनानें प्राप्त झालेल्या इतिहासाचा मागोवा घेतला तर अजिंठ्याची लेणी दोन हजार वर्षांपूर्वी खोदण्यांत आली असे दिसून येईल. बौद्धभिक्षूंनी पावसाळ्यांत मुक्काम करतां यावा म्हणून औरंगाबादपासून ३६ मैलांवर ही २९ लेणी डोंगरांत खोदली आहेत. सामान्य जनापासून दूर अशा या निसर्गरम्य ठिकाणीं धर्मचिंतनांत ते बौद्धभिक्षू रमत होते. इथल्या चैत्यगृहांतले शंख, नगारे वाजूं लागले, घंटारव सुरू झाले कीं भगवी वस्त्रें परिधान केलेले बौद्ध भिक्षूंचे जथेच्या जथे आपल्या विहारांतून बाहेर पडत आणि इथल्या चैत्यगृहांत जाऊन स्तूपपूजा करीत. कितीतरी शतकें 'बुद्धं सरणं गच्छामी'चा घोष भोंवतालच्या दऱ्याखोऱ्यांतून प्रतिध्वनीत होत होता.

संसार सोडून परमेश्वर चिंतनांत रमलेले ते निःसंग साधू होते. पण असे असले तरी त्यांच्यांत तर्ककर्कश कठोरता वसत नव्हती. जीवनापासून ते अलिप्त असले तरी जीवनावर ते रुष्ट झालेले नव्हते. संसारांतल्या सुखदुःखाकडे पाठ फिरवूनही त्या संसाराबद्दल त्यांना आदर वाटत होता. आणि म्हणूनच त्या संन्याशीं जिवांनी फावल्या वेळांत तो संसार चित्रांकित करण्याचें ठरवलें. चित्र काढण्यासाठीं सपाट पृष्ठभाग मिळावा म्हणून माती, काव, दगडाचे चूर्ण, भाताचे तूस, नारळाची शेंडी यांचा लगदा करून त्याचा पाव इंच रुंदीचा जाड लेप त्यांनी दगडाच्या खडबडींत भिंतीवर चढवला. त्यावर प्लॅस्टरचा थर दिला आणि चुन्याच्या निवळीनें रात्रभर भिंती भिजवल्या. काजळापासून काळा, चुन्यापासून पांढरा, निळेपासून निळा, गेरु किंवा हरमुचीपासून तांबडा, सिंदुरापासून शेंदरी, हरताळ व पळस यापासून पिवळा अशा नाना द्रव्यांचे नाना रंग तयार केले. मोठ मोठे आरसे आपल्या वसतिस्थानाच्या बाहेर उभे करून आणि त्यांतून सूर्यकिरण परावर्तित करून लेण्यांतील काळोख्या भींती प्रकाशित केल्या. आणि ज्या संसारापासून ते दूर झाले होते तो संसार त्यांनी रंगरेषांत साकार केला. त्यांनी रेखाटलेला हा संसार








अनुक्रमणिका

कितीतरी सुखकारक होता. ज्ञानश्वरांनी म्हटले आहे कीं, "चित्रांतला अग्नी कधीं दाहक असतो कां ?" तद्वत् हा संसार त्यांना सुखदु:खाचे चटके देऊं शकत नव्हता. उलट त्या चित्रांतून प्रतिबिंबीत झालेल्या संसाराकडे तिऱ्हाईत या नात्यानें पहातांना त्यांना स्थितप्रज्ञाच्या कैवल्यसुखाची अनुभूति मिळत होती.

हें काम कांहीं एका व्यक्तीनें केलेलें नाहीं. भिक्षू कलावंतांचा संघच्या संघ कामाला आरंभ करी. सर्वसामान्य कलावंत प्रथम कावेनें रेषाकृति काढी. त्यांतील प्रमुख चित्रकार ती रेषाकृति काळ्या रंगानें दुरुस्त करी. मग काळसर हिरव्या रंगानें संपूर्ण चित्रछटा भरल्या जात. या चित्रछटेमुळें चित्रांतील रंगांत एकतानता उत्पन्न केली जाई. या हिरव्या छटेवर मग विविध रंग देण्यांत येत. अखेरीस पुन्हा रेषाकृती काढली जाई. अशा प्रकारें चित्रें काढण्याचें हें काम कैक शतकें आणि कैक पिढ्या चालू होतें. पण तें करीत असतांना त्यांना कधीं कंटाळा आला नाहीं. त्यांच्या रेषा कधीं बेडौल झाल्या नाहींत. त्यांच्या रंगछटांतील आल्हादाला ओहोटी लागली नाहीं.

कारण त्यांच्या कार्यांत एकतानता होती. त्यांच्या प्रभूचें जीवन चित्रांकित करण्यांत ते देहभान विसरले होते. बौद्ध जातकांतल्या कथा रंगवतांना ईश्वरी प्रेमानी ते जीव भारले गेले होते. भगवान बुद्धानी मानवी देह धारण करण्यापूर्वी वेगवेगळ्या योनींत जन्म घेतला. हत्ती, माकड, हरीण, हंस अशा विविध योनींतून हा थोर आत्मा फिरला. त्या त्या योनींतही त्यानें आपल्या अपार दयाशीलतेचा साक्षात्कार घडवला. त्याच्या पूर्वजन्मींच्या कथा चित्रीत करण्यासाठींच हे कलावंत सरसावले होते. त्या भगवानाची करुणा, दयाशीलता, सहृदयता, मानवता ही सारी त्या कलावंतांच्या हृदयांत जागृत झाली होती. आणि म्हणूनच त्यांच्या कुंचल्यांतून निघालेलीं चित्रें सुकोमल भावनांनी नटली. इथली हत्तीची आकृति असो कीं हंसाची आकृति असो त्या प्राण्याविषयीं कलावंताला विलक्षण सहृदयता वाटते आहे. तो त्या मुक्या जिवांशीं समरस झाला आहे.

या दृष्टीनें खद्यन्त जातकावर काढलेलें चित्र पहाण्यालायक आहे. हत्तीच्या स्वरूपांत जन्म घेतलेल्या बुद्धाला राजा पकडून नेत असताना त्या हत्तीची झालेली केविलवाणी स्थिति, तें त्याचें सोंड गुंडाळून घेणें आणि बारीक डोळ्यांनी पहाणें मनालाच चटका लावते. तो हत्ती राजगृहांत गेल्यावर उपोषण करतो आणि त्याच्या उपोषणानें दयार्द्र झालेला राजा जेव्हां त्याला इतमामानें जंगलांत सोडायला निघतो तेव्हांचा त्या हत्तीचा आनंद, त्याचें तें डौलानें चालणें मनाला सुखसंवेदना देते. जंगलांत गेल्यावर तो हत्ती वृद्ध मातापित्यांना भेटतो तेव्हां त्या हत्तीची आई त्याच्यावर सरोवरांतली कमळे उधळते आणि अंध पिता आपल्या सोंडेनें त्याचें अंग गोंजारतो तो देखावा पाहिला म्हणजे वाटतें हा चित्रकार 'कालिदास' तर नव्हता ! जी सहृदयता वाङमयांत प्रगट व्हावी आणि ज्या कल्पना काव्यांत फुलाव्यात त्या इथें चित्रकाराच्या कुंचल्यांतून उतरल्या आहेत.

तसें पाहिलें तर 'अजिठ्याची चित्रें' म्हणजे एक महाकाव्यच आहे. महाकाव्याची गुणवत्ता अजमावताना सृष्टीची सारी रूपें, जीवनांतल्या साऱ्या उर्मी, मानवी स्वभावाच्या साऱ्या छटा, समाजाच्या साऱ्या आकांक्षा त्यांत समाविष्ट व्हाव्यांत अशी टीकाकार अपेक्षा धरतात. अजिठ्यांतील चित्रें ह्या साऱ्यांचें दर्शन घडवतात. अजिठ्यांतील चित्रांत काय नाहीं ? सुख, दु:ख, राग, द्वेष, भिती, असुया, करुणा, दातृत्व वगैरे साऱ्या मानवी भावना इथें फुलल्या आहेत. सृष्टींतील नाना तऱ्हेचीं पानें, फुलें आणि पशु, पक्षी यांनी इथली चित्रें नटली आहेत. वेषभूषेच्या, अलंकारांच्या बहुविध तऱ्हा इथें पहायला मिळतात. राजाचे राजवाडे, गणिकांची नृत्यगृहें, भिक्षूंची प्रार्थनास्थानें, दुकानें, रस्ते, वनें आणि उपवनें यांचें दर्शन इथें घडतें. ज्या काळांत अजिठा चित्रांकित केला गेला तो गुप्तकाळच जणू इथें प्रतिबिंबित झाला आहे. जीवनाचें इतकें मनोज्ञ प्रतिबिंब दाखवणारी कला जगन्मान्य ठरली नाहीं तरच नवल !

ज्या काळांत अजिठ्यांतील कलाकृति निर्माण झाल्या त्या काळांतच त्यांची कीर्ति देशभर पसरली. चिनी प्रवासी ह्यू-एन्त्संग यांनीही या लेण्यांतील कलासौंदर्याची नोंद आपल्या स्मृतिटिपणांत करून ठेवली आहे. एवढेंच नव्हे तर अजिठ्यांतील पद्मपाणी बुद्धाचीच नक्कल चीनमधल्या लेण्यांतून करण्याचा प्रयत्न त्या काळांत करण्यांत आला होता. पण एवढे असले तरी या लेण्यांना अज्ञातवासही मोठ्या विलक्षण तऱ्हेनें भोगावा लागला. बौद्ध धर्माचा ऱ्हास झाल्यामुळें म्हणा किंवा प्लेगसारखी एखादी सांथ या प्रदेशांत पसरल्यामुळें म्हणा इ. सन ८ व्या शतकानंतर या लेण्यांतील मनुष्यवस्ती नाहिशी झाली. झाडाझुडपांनी या लेण्याकडे येणारे रस्ते बुजून गेले. वेलीच्या जाळ्यांनी आणि डोंगरावरून घरंगळत येणाऱ्या दगडांनी त्यांची प्रवेशद्वारें दिसेनाशी झाली. आणि वाघकोल्ह्यांच्या वस्तीनें या बाजूला फिरकणेंहि माणसांना भितीदायक वाटू लागले. जवळ जवळ एक हजार वर्षे या लेण्यांना मानवाचा पदस्पर्श झाला नाहीं.

१८१९ सालीं वाघाची शिकार करण्याच्या इराद्यानें मद्रास आर्मीचा एक रिटायर्ड ऑफिसर या जंगलांत शिरला आणि अगदी अनपेक्षितपणें ही लेणी त्याच्या नजरेस पडली. पलित्याच्या प्रकाशांत या अद्वितीय कलाभांडाराचें त्यानें दर्शन घेतले. आणि त्यानंतर मग अनेक लोकांनी ही लेणी पाहिली. जगभर या कलासंपदेची ख्याति पसरली. कांट्याकुटयांनी व्यापलेले मार्ग साफ करण्यांत आले आणि या लेण्यांत माणसांची ये-जा सुरू झाली.

पण यामुळेंच या चित्रकृतींचें एक प्रकारें अरिष्ट ओढवले. गेले हजार वर्षांत झालें नव्हते एवढे नुकसान या प्रेक्षकांच्या येण्यामुळें घडूं लागलें. चित्रांचे खपले काढून ते पळवून नेणाऱ्या कला (अ) रसिकांची काकदृष्टी या लेण्यांतील चित्रावर पडली. डोंगरांतून झिरपणाऱ्या पाण्यानें चित्रें खराब होतात म्हणून त्यांना व्हार्निश फासण्याची कल्पना एका विद्वानांनी सुचवली. पण या व्हार्निशमुळें भितींतून बाहेर येणारें पाणी आंतच सांचू लागले आणि त्याच्या दाबामुळें भितीचे भराभर खपले पडूं लागले. आज ही चित्रलेणी केवळ गतकालची आठवण उरली आहेत. फाटक्या वस्त्राकडे पाहून मूळ सणंगाची कल्पना करण्याचा प्रयत्न करावा तद्वत् चित्रांचे भग्नावशेष पाहून रसिक मनाला मूळ कलेची आठवण करावी लागते. बाकी हेंही खरेंच कीं या जगांत अक्षय्य असें काय आहे ?—भूतलावर स्थिरावलेल्या शापीत देवांगना झाल्या म्हणून काय झालें—त्यांना तरी या मर्त्य लोकांत अमरत्व कसें लाभणार ? ● ● ●



—शां. शं. रेगे

**अत्तरांचें, सुगंधांचें, स्नानोपयोगी सेन्टस्चें अमृताला भारी वेड होतें.**

**पण तें 'वेड'च फार 'भारी' किंमत मागूं पाहत होतें-पण —**

"**रोशनआरा**"मध्यें त्या रात्रीं विशेष गर्दी नव्हती. कदाचित् गेले दोन तीन दिवस पडत असलेल्या पावसामुळें शोकीन लोक बाहेर पडले नसतील अथवा 'गोलचा'ला लागलेल्या 'क्लिओपॅट्रा', 'ओडिअन'ला लागलेल्य। 'ताजमहल' किंवा नाझला लागलेल्या 'सेहरा'च्या आकर्षणामुळेंही इथें गर्दी कमी असेल. माझ्या नेहमीच्या टेबलाच्या बाजूचे कोपऱ्यांतले टेबल रिकामे होते. बाकीच्या कांहीं टेबलावर कांहीं युगुलें व कांहींवर कोणी सुखासीन शोकीन बसलेले होते. 'रोशनआरा'मध्यें मोगलाई, कश्मिरी, पंजाबी तसेंच पाश्चात्य पद्धतीचे पदार्थ मिळत असत. पूर्वी इथें युरोपियन लोक आराम करण्यासाठीं येत असल्यामुळें इथें 'बार' होता तसेंच नृत्यासाठींही मोठा हॉल सुशोभित केलेला होता. अलिकडे मात्र नृत्याचे कार्यक्रम फक्त ईस्टर, ख्रिसमस वगैरे सणांच्या वेळीं होत असत. 'बार' मात्र अजून सुसज्ज ठेवलेला होता आणि पाश्चात्य लोक व स्थानिक पर्मिटहोल्डर्स सोडून इतरांना तिथें पेयपान करण्यास परवानगी नव्हती.

माझ्या टेबलावर मी बीअर घेत बसलो होतो. इतक्यांत एक पंजाबी जोडपें दरवाज्यांतून आंत प्रवेश करतांना मला दिसलें. चीफ वेटरनें त्यांना अदबीनें सलाम करुन माझ्या शेजारच्या टेबलाकडे आणून पोचवलें आणि तो पलिकडे गेला. खुर्चीवर बसतां बसतांच त्या स्त्रीनें आपल्या खांद्यावरची काश्मिरी शाल काढली आणि रिकाम्या खुर्चीवर पर्स आणि शाल ठेवून ती बसली. तिच्या बरोबरचा टेरिलीन्चा अद्यावत् सूट घातलेला तो तरुणही बसला. इतक्यांत माझ्या वेटरनें माझ्यासमोर चीज वेफर्स आणि पोटॅटो चिप्स् ठेवले व तो पलिकडच्या टेबलाकडे जाऊन ऑर्डरसाठीं उभा राहिला. तो उभा रहातांच त्या जोडप्याचें आपापसांत कांहीं संभाषण झाल्यावर वेटरला ऑर्डर दिली गेली आणि तो तिथून गेला.

समोरचें जोडपें माझ्या इतक्या जवळ होतें कीं, त्यांचें मुद्दाम निरीक्षण करणें अशिष्ट ठरलें असतें. तरीपण बीअरचा घोट घेतांना हळूंच मी त्यांच्याकडे पाहात होतो. त्या तरुणीनें 'डे अॅन्ड नाइट'ची जॉर्जेट साडी आणि त्याला शोभेल असा ब्लाउज् घातला होता. तिची केशभूषा, रंगभूषा आणि एकंदर नूर पाहून ती आधुनिक सुखवस्तु घराण्यांतली वाटत होती. क्वचित् हिंदीमध्यें आणि अधुनमधून इंग्रजीमध्यें चाललेलें त्यांचें संभाषण मला ऐकूं येते. 'डिअर' 'डार्लिंग' इत्यादि भाववाचक शब्दांवरून तें नूतन विवाहित युगुल असावें असा भास होता. ह्या आधुनिकपणाची आणखी एक साक्ष वेटरनें त्यांच्या-





अनुक्रमणिका

समोर ठेवलेली व्हिस्कीची बाटली व ग्लास देत होतीं. त्या तरुणीनें दोन्ही ग्लासांत मद्य ओतलें व आइस्क्यूवस् आणि सोडा वेटरनें ग्लासांत घातल्यावर एकमेकांच्या ग्लासांना स्पर्श करुन त्यांनीं व्हिस्कीचे घोट घेतले. थोड्या वेळानें वेटरनें तंदूरी चिकन्, नान् व सॅलडच्या वशा त्यांच्या टेबलावर आणून ठेवलेल्या मी पाहिल्या. आपापल्या प्लेट्समध्यें पदार्थ वांटून घेतल्यावर त्यांनीं खाण्यास सुरुवात केली. मद्यानें वास्तविक मनुष्य अधिकच बोलूं लागतो. पण हा तरुण मात्र मला जरा अबोलच वाटला. खाण्यावर मात्र त्यानें निकरानें हल्ला' चढविला होता. ती तरुणी खातापितांना बोलत होती त्याजकडें त्याचें लक्ष नव्हते. क्वचित् मान हालवूनच तो तिला साद देत होता.

त्या तरुणानें मीठाची बाटली उचलण्यासाठी हात पुढें केला आणि त्याच्या थरथरत्या हाताचा धक्का लागून किंवा नीट उचलतां न आल्यामुळें मीठ पटकन् सांडलें. त्यावरोवर ती तरुणी दचकली. शुभाशुभाची जाणीव झाल्यामुळें ती पटकन् म्हणाली, "डाव्या खांद्यामागें हळूंच एक चिमटी मीठ फेकून दे, प्रेम डार्लिंग !"

त्यावर तो ताडकन् म्हणाला, "सब झूट है" आणि त्यानें सुरीच्या पात्यानें तें सांडलेलें मीठ पुन्हां पात्रांत भरले. त्याच्या ह्या निष्काळजी वृत्तीला आणखी धक्का देण्यासाठीं कीं काय हात मागे करतांना मस्टर्ड पावडरची बाटली त्याच्या कोपराच्या धक्क्यानें टेबलावरून कोलमडून माझ्या पायाशीं पडली. मी तावडतोब ती उचलली आणि त्यांच्या टबलावर ठेवली. ती ठेवतांच ती तरुणी हंसून मला 'थॅंक्यू' म्हणाली. माझें कुतूहल आतां जागृत झालें होतें कीं माझ्या बडबड्या स्वभावानें उचल खाल्ली कोणास ठाऊक. मी पटकन् म्हणालों, "आपण फारच धर्मभोळ्या वृत्तीच्या दिसतां. मीठाची चिमटी खांद्यावरून फेकण्याच्या आपल्या सूचनेबद्दल बोलतोय् मी माफ करा !"



माझें बोलणें त्या जोडप्याला आगाऊ वाटलें नाहीं. 'रोशनआरा'-सारख्या रेस्तॉरांमध्यें येणाऱ्यांना तसे वाटण्याचा संभव नव्हता हें ओळखूनच मी बोललो होतो.

"आपण म्हणतां तशी ही माझी धर्मभोळेपणाची सूचना असेल. पण तसें करतांना अनेक पाश्चात्यांना आम्ही पाहिले आहे." ती तरुणी उद्गारली. "पण आपल्या पतिराजांना ती खुळीच वाटली ना ?". मी परत म्हणालों. त्याला उद्देशून माझें म्हणणें असल्यामुळें तोही आपली सुधारकी वृत्ति प्रगट करण्यासाठीं म्हणाला, "हं खुळी नाहीतर काय ! नसत्या भ्रामक समजुतींनी ही स्वतःला आणि दुसऱ्याला घाबरवून सोडते. पीठ, मिरी आणि साखर सांडली तरी त्याचे कुणाला कांहींच वाटत नाहीं मग मीठानेंच काय घोडे मारले आहे ?" तो हंसून त्या तरुणीकडे आणि माझ्याकडे पहात बोलला आणि त्यानें खांदे उडवले. मुद्दाम संभाषण वाढविण्याच्या दृष्टीनें मी बोललों, "असं म्हणतात कीं मीठ, कुणी मागितले तरी देऊं नये. तसे दिल्यानें घेणाऱ्याला अनिष्ट ठरते. आपण बाईसाहेबांच्या बाजूकडे मीठ सांडलेत आणि त्यांची सूचना मान्य केली नाहींत हे त्यांना अनिष्ट वाटणें साहजिक आहे."

"उंऽ मी असल्या भ्रामक कल्पना मुळींच मानीत नाहीं अणि कुणी मानूं लागला तर त्याला उत्तेजन देत नाहीं." तो तरुण बोलला.

"पण बाईसाहेब मानतात ना ? मग त्यांच्या समजुतीसाठीं तरी..."

"हो मांजर आडवे गेले तर मी पुढें जात नाहीं. चतुर्थीचा चंद्र पाहत नाहीं. माझी आपली समजूत आहे. खुळी म्हणा वाटल्यास !" ती तरुणी गंभीरपणें बोलली.

तिच्या ह्या बोलण्यानें माझ्या मनावरही गांभीर्याचें पटल आलें. मलाही आमच्या घरांतील देवभोळ्या वृत्तीची आठवण झाली. संभाषणाला निष्कारण गांभीर्याचें वळण लागूं नये म्हणून सहज मी पुढे बोललो,

"आणि स्वप्नांवर आपला विश्वास आहे का ?"

माझ्या ह्या प्रश्नानें अचानक तिचा चेहरा अधिक गंभीर झाल्या-सारखा मला वाटला. तिनें हळूंच मान वळवून आपल्या पतीकडे पाहिले आणि म्हणाली,

"कुणास ठाऊक ? पण अलिकडे मला विचित्र स्वप्नें पडत असतात. अनेकांना वाईट स्वप्नें पडतात पण माझीं भयंकरच."

मी त्यावर गंभीरपणें बोललो, "आपल्या आयुष्याचं एक तृतियांश काळ आपण झोपेंत घालवतो, आणि झोपेंतच आपणांस स्वप्नें पडतात. पुष्कळ स्वप्नें खरी ठरतात, असें माझ्या प्रत्ययास आले आहे. विशेषत पहाटेची तरी !"

माझें बोलणें त्या तरुणाला आवडलें नसावें. कदाचित् हें संभाषण वाढविण्याचा माझा यत्नही त्याला आगाऊ वाटला असेल. मला गप्प रहावयास सांगणें शिष्टधर्मास युक्त ठरलें नसतें. तो आपल्या पत्नीकडे वळून म्हणाला,

"डार्लिंग, तुझें जेवण थंड होत आहे."

मलाही माझ्या आगाऊपणाची लाज वाटली होती. पण माझी भूमिका स्पष्ट करावी म्हणून मी बोललो, "माफ करा ! मी आपणांस

अनुक्रमणिका








संभाषणांत गुंतल्यामुळें आपलें जेवण थंड झालें. पण सहज मीठाच्या सांडण्यावावतच्या आपल्या उद्गारांमुळें मला कुतुहल वाटलें. मी औद्योगिक रसायनशास्त्राचा तज्ञ आहे. निरनिराळ्या क्षारांचे गुणधर्म, त्यांच्या मिश्रणाचे प्रभाव तसेंच क्लोराइड्स्, क्रिस्ट्ल्स् ह्यांचा मी विशेष अभ्यास केला आहे. सेन्ट्स्, सुगंध, शॅम्पू, पावडरी इत्यादिकाच्या बाबतींत मी नवनवीन प्रयोग केले आहेत आणि तत्सम व्यवसायाचा कन्स्ल्टन्ट म्हणून मी काम करतो. एका नवीन प्रयोगा बावत सरकारच्या व्यापारउद्योगखात्याला सल्ला देण्यासाठीं मी इथें आलो आहे."

अत्तरांचें नांव काढतांच ती तरुणी मान वर करून म्हणाली, 'मलाही सुगंध फार आवडतो. मी वेडी आहे म्हणा त्यावावत. फुलें अत्तरें, पावडरी, सावण — आंघोळीच्या पाण्यांतही मी सुगंधी सॉल्ट्स् वापरते."

"आपला आवडता सुगंध मी सहज ओळखीन !" माझ्यांतला रसायनशास्त्रज्ञ आतां जागा झाला होता.

"कसा ओळखाल ?" ती तरुणी उत्सुकतेनें म्हणाली.

"गार्डेनिया, होय ना ?" माझ्या अचूक उत्तराचें तिला आश्चर्य वाटलें. मी पुढें बोललो, "आपण मघाशी आल्यावरोबर सुगंध दरवळला तेव्हांच मी ओळखला. असला सुंदर व अपरिचित सुगंध निवडल्यावद्दल मी आपलें अभिनंदन करतो."

"आपल्या धंद्यांत नेहमीच सुगंध न् सुगंध. भाग्यवान् आहांत आपण !" ती सहर्ष स्वरांत म्हणाली.

"होय भाग्यवान् तसा दुर्दैवीही. अतिपरिचयानें अवज्ञा होते तसे ह्या सुगंधाचे आतां मला विशेष कांहीं वाटेनासे झाले आहे. केतकी-वनांत साप दडून बसतो हे सुगंधाच्या वावतींत विसरतां कामा नये; सुगंध सुखदायक असतात तसे ते जीवघेणेही ठरतात. सर्वच सुगंधाक विनधोक नसतात. उदाहरणार्थ, पाश्चात्य लोक आंघोळीसाठी जी क्रिस्ट्ल्स् वापरतात ती पुष्कळदां विषारी आणि घातकारक असतात. आपणही तशी वापरतां म्हणून सांगतो. ती निवडतांना अस्सल जात ओळखणें कठीण जाते. आजकाल परदेशी मालाची आयात बंद झाल्या-मुळें बाजारांत मिळणारीं सेन्ट्स्, पोमेड्स्, सॉल्ट्स्, पावडर्स अस्सल असतात असें नाहीं. शौकानें दामदुमटीनें आपण विकत घेतो आणि त्याच्या उपयोगामुळें आपल्या कातडीला, केसाला आणि शरीराला अपाय करून घेतो."

त्या तरुणानें उत्साहानें संभाषणांत भाग घेतला, "मलाही ह्या रसायनशास्त्राची आवड आहे. माझ्या काकाचे कॅनॉट सर्कसवर औषधाचें दुकान होतें. लहानपणीं दुकानांत बसून कम्पाउन्डर औषधें तयार करतांना मी कुतुहलानें बघत असे. माझ्या उपद्‌व्यापी स्वभावा-मुळें मीही गुपचुपपणें औषधें तयार करत असतां काकांनीं एकदां मला पकडलें. दम दिला आणि विषप्रयोगाची भीति दाखवून आंत जाण्याची बंदी केली."

"पण औषधांची गोष्ट निराळी आणि अत्तरांची निराळी. अत्तरें निरुपद्रवी असतात" ती मध्येंच बोलली.

"भलताच निर्वाळा देऊं नका. अत्तराच्या शौकानें खून झालेले इतिहासांत नमूद आहेत. विषकन्या सुंदर होत्या पण त्यांच्या सौंदर्याचा उपयोग करून अनेकांचा घात केला गेला आहे. तेच सुगंधाच्या वाव-तींतही. माझ्या आयुष्यांतली एक शोकांतिका आठवली म्हणजे मला ह्या सुगंधाचें भारी भय वाटतें. पण जाऊंदे ! फार बोललो. आपलें जेवण थंड झालें असेल."

त्या तरुणाची उत्सुकता जणुं वाढली होती. तो म्हणाला "सांगा, सांगा फारच इन्टरेस्टिंग आहे तुमचें बोलणें. आम्ही जेवतांना ऐकतो."

"एका नवविवाहित तरुणीच्या स्नानगृहांतल्या मृत्यूचा संबंध ह्याच सुगंधी सॉल्ट्स्शीं आहे. पण नको ती भीषण आठवण ! मघांशी आपण स्वप्नांवद्दल बोलत होतों. मला सांगायचं कीं. माझा एक अनुभवी आडाखा आहे. एकच स्वप्न जर सतत पडत राह्यले तर ती एक दैवी सूचना आहे असे मानावे. त्याकडे दुर्लक्ष करूं नये. आपला स्वप्नावद्दलचा काय अनुभव आहे ?" मी विचारलें.

तो तरुण गंभीरपणें जेवत होता. पण ती तरुणी बोलण्यास उत्सुक दिसली. आपल्या बडबडीनें नवरा पुन्हां चिडेल म्हणून की काय तिनें त्याच्याकडे पाहिलें आणि ती तुटकपणें म्हणाली,

"कसला अनुभव. एकच भयंकर स्वप्न मला अलिकडे पडतें आणि तेही नेहमीं एकाच वेळी."

'पण कसलें तें तरी सांगा !" मी उत्सुकतेनें विचारलें.

"आपणांस मूर्खपणाचें वाटेल कदाचित्. मी झोपल्यावर माझा डोळा लागतो न लागतो तोंच स्वप्नाची सुरुवात होते. कुठेतरी अंधा-रांत एक हात मला चांचपडत असल्याची भावना होते. कुठेतरी प्रकाश पडतो आणि ह्या हातांत मला चकाकणारी सुगंधी सॉल्ट्स्— निरनिराळ्या रंगाची दिसतात. आपणांस मघांशीं सांगितलें कीं मला ह्या सुगंधी स्नानाचें वेड आहे. आमच्या घरांत पाश्चात्य वातावरण असायचें. पूर्वी आमच्याकडे बडे गोरे अधिकारी पाहुणे म्हणून उतरायचे. त्यांच्यासाठीं राखून ठेवलेल्या खोल्यांत संगमरवरी स्नानपात्रें असावयाची. पाहुणे नसले म्हणजे त्या खोल पात्रांत डुंबत मी मनसोक्त स्नान करीत असे. पुढें वडिलांच्या पाठीं लागून माझ्यासाठींही मी असें एक स्नानपात्र आणून घेतलें. तेव्हांपासून ह्या सुगंधी स्नानाचा मला हव्यास आहे. तर काय मी सांगत होते ? हां —" ती आठवून पुढें बोलणार तोंच मी म्हणालों,

"माफ करा, मी म्हणत होतो ती शोकांतिका ह्याच प्रकारची आहे." त्यावर ती म्हणाली, "सॉरी ! मग मी पुढें सांगत नाहीं. क्षमा करा आपल्याला दुःख झालें असेल तर !"

"छे, छे ! तसे कांहीं नाहीं. सांगा आपण आपलें स्वप्न" मी म्हणालो. इतक्यांत तो तरुण सुरीकाटा प्लेटमध्यें ठेवून नॅपकीन उचलत म्हणाला, "काय भलती बडबड लावली आहेस. वस्स कर. अमृता ! त्यांना कंटाळा आला असेल."

"छे, छे, महाराज ! उलट मलाच अधिक उत्सुकता आहे. सांगा, सांगा आपण.....तर तो हात येतो. आपणांस सुगंधी चकाकणारीं सॉल्ट्स् त्या हातांत दिसतात. मग पुढें ?" मी उत्सुकतेनें म्हणालो.

अनुक्रमणिका

"——तर ती चकाकणारी द्रव्यें अंधारांत सांडतात....पाण्यांत पडतात अणि तो हात स्नानपात्रांत असलेल्या माझ्या देहाजवळ येतो.... माझा गळा धरतो....मी पाण्यांत गुदमरूं लागते...धडपड करते सुटण्यासाठीं ... ओरडते....आणि... माझ्याच आवाजानें दचकून मी जागी होते......"

इतक्यांत खळकन् आवाज झाला. त्या तरुणाच्या हातांतले मद्याचे ग्लास एकदम खालीं पडून त्याचा चक्काचूर झाला होता. त्या आवाजानें आजुबाजूच्या माना आमच्याकडे वळल्या. वेटरही घाईघाईनें टेबलाजवळ आला व त्याने कांचा गोळा केल्या. ह्या अडथळ्यामुळें आमचें संभाषण थांबलें. त्या तरुणानें वेटरला आइस्क्रीम आणण्याची ऑर्डर दिली. मी पण बाटलींत उरलेली बीअर् ग्लासांत ओतली आणि ती संपवण्यांत दंग झालो.

त्या तरुणीनें आइस्क्रीमला स्पर्श केला नाहीं. मद्याच्या मीठ सांडण्याच्या आणि दुसऱ्या ह्या ग्लास फुटण्याच्या अपशकुनाची जणुं तिला खंत वाटत होती. कांहीं वेळ स्तब्धतेंत गेला. तो तरुण आतां उत्सुक दिसला. आपलें आइस्क्रीम संपल्यावर त्यानें तिची प्लेट पुढें ओढली आणि ते संपल्यावर नॅपकिन् गुंडाळून त्यानें टेबलावर ठेवला. माझ्याकडे त्यानें एकदोनदां पाहिलें. त्याला माझ्याशीं कांहीं तरी बोलायचें होतें असे दिसलें. माझा बीअरचा ग्लास रिकामा करून मी टेबलावर ठेवला, आणि कोटाच्या खिशांतून सिगारेट केस काढली. त्याची सोनेरी सिगारेट केस तो नुक्तीच उघडण्याच्या विचारांत होता.

"हॅव विस् प्लीज्" असे म्हणत त्यानें केस उघडून मजपुढे धरली. "ह्या अस्सल इंग्लिश नेव्ही कट् आहेत. माझ्या एका मित्रानें स्मगल् केलेल्या. माझा ठराविक ब्रॅन्ड् असल्यामुळें दामदुप्पटीनें मी विकत घेतो."

"थँक्स्" असं म्हणून मी एक सिगारेट घेतली. सिगारेट पेटवल्यावर जणुं कांहीं विशेष घडलें नाहीं ह्या आविर्भावांत तो बोलला, "मघांशी आपण कांहींतरी शोकांतिकेबद्दल बोलत होतां. आपली हरकत नसेल तर सांगा ना ?"

"छे, छे, हरकत कसली. जो होना सो हो गया......"

इतक्यांत ती तरुणी मध्येंच बोलली, "कशाला त्यांना पुन्हा त्या दुःखाची आठवण करून देतां !"

तो तरुण कांहीं बोलणार तोंच मी म्हणालो, "छे, छे तस कांहीं नाहीं. मी सांगितली नसती ती दुर्दैवी कहाणी. पण बाईसाहेबांच्या स्वप्नासारखीच आहे म्हणून सांगणें प्राप्त आहे. आपली हरकत नसेल तर सांगतो." त्याच्याकडे रोखून पहात मी बोललो.

"नो, नो, सांगा ! आय् ॲम इंटरेस्टेड" तो निर्विकारपणें म्हणाला. पण त्याच्या मनांतली अस्वस्थता त्याच्या हालचालींत आणि स्वरांत दिसली.

"मी त्यावेळीं सिकंदराबादला होतो. माझ्या एका परम मित्राचे तिथें 'डिपार्टमेन्टल स्टोअर्स' होते. नुक्ताच मी युद्धावरून परत आल्यामुळें विश्रांतीसाठी तिथे आलो होतो. नुसता रिकामा वेळ कसा घालवायचा ह्या विवंचनेंत असतांना मित्राच्या आजारामुळें त्याच्या दुकानांत जाण्याची एकदां पाळी आली. सिकंदराबादला युरोपियन लोक पुष्कळ, आणि माझ्या मित्राचे दुकान हमरस्त्यावर असल्यामुळें

(पान ५२ वर पहा)






—वामन इंगळे

"त्याच्या घरीं देर आहे-पन अंधेर नाहीं" हें म्हणणें मायच्या बाबतींत खरें ठरलें. पण—

**माय** रूपानं तशी स्वभावानंहि गोड. कपाळामधोमध असलेल्या मसाभोंवती रुपयाएवढं कुंकूं लावून ती कुठं बाहेर निघाली म्हणजे फोटोंतली साक्षात् लक्ष्मी फोटोबाहेर आल्यासारखी वाटे. कुणाला तोडून बोलणं तिच्या जिवावर येई. अडल्या-नडल्याला शेरपसा देतांना तिला कधीं कडु वाटलं नाहीं. कुणाच्या सुतरफेण्या करून दे, नवाडीला घापोडचाचं पीठ कालवायला शिकव, असं तिचं नेहमींच चालायचं वेटाळांतल्या वयानं वडील बाया बसायला आल्या म्हणजे ती म्हणे,

"बसन वो दादीबाई घडीक. आताच आली कशी आन चालली कशी."

ती मग अंगवणीनं दादीबाईला पान कांडून द्यायची. माय चाळीशीच्या घरांत आली पण तिला अजून मुलगा नव्हता. तशा दोन लेकी घर आटपालायक होऊन आपापल्या घरीं नांदावयास गेल्या होत्या. पण मुलगा न झाल्यानं हें सारं नव्हत्याच्या बरोबर होतं. गणपतराव, तिचे मालक कांहीं फोड फोडून दाखवीना. ते कांहींच बोलायचे ना. पण म्हणून मायचा जीव जास्तच झुरणीस लागला.

चिंधु बुढा व कमरु मुसलमान ही नोकर-मंडळी. पण तेहि घरचेच जीव. मायचा कमरुवर मोठा जीव. त्याला उराळी झाली म्हणजे ती त्याला हराळा करून द्यायची. माय म्हणे ह्यालेहि लेक कोन आहे ? चिंधु बुढा तर तिच्या मालकाचा मानलेला मामा. त्याला ती आजीसासऱ्याचा मान द्यायची.

या घरांत वंशाचा दिवा नाहीं याची काळजी म्हणूनच सर्वांना अंगारे धुपारे झाले. मायला याची लाज यायची. नातापंतांची व इव्हायाजवायाची झाली तरी हें सोंग ? लोक काय म्हणतील ? पण तरी तिनं चोरून मारून सगळं केलंच. पण तरी हर महिन्याचा तांब्या आपला उपडाच.

तिला कानकोंड्यासारखं होऊं लागलं. सगळे जण तिच्याकडे आशेनं पहायचे. तिला वाटे, हें कां कोणाच्या हातचं आहे ? घेतली माती आन घडवलं बाहुलं ? मग हे लोक असें काय पिशासारखे पाहतात ? तिला कांहीं कळेना.

वाढत्या वयाबरोबर चिंता काळीज कोरूं लागली आणि आशा कमी होऊं लागली. शेवटीं गणपतरावनं इस्टेट आपल्या पुतण्याला, शंकरला द्यायचं पक्कं केलं. शंकरच्या बापाला आयतं गाठोडं मिळणार म्हणून खुषी झाली. तो आतां गणपतरावच्या इस्टेटीकडे जरा ज्यास्तच आपुलकीनं पाहूं लागला. कारण नसतांना गडी माणसांना गुरकाऊं लागला. कमरु व चिंधु बुढयानं मायकडे तक्रारी आणल्या. कमरु म्हणाला,

"इची मायबहिन, लयच आंगात आंते यो शंकऱ्याचा बाप. हरामाचा माल भेटनार आहे म्हून असन हे झ्यांगटुबाजी."

चिंधु बुढा म्हणाला,

"तय फुटलं ढोकायचं घन."

माय त्यांच्या अशा तक्रारीवर कांहीं बोलायची नाहीं. डोळ्याला पदर लावून सारवणाची घमीली ती अधिक जवळ ओढायची.

पण काय जादु घडली कुणास ठाऊक. पण मायचा तो महिना टळला. अन् मग



अनुक्रमणिका






साराच नूर पालटला. मायचा चेहरा पुन्हां तुळशीच्या पानासारखा टवटव दिसूं लागला. तिच्या छातीवरचं ओझं उतरलं. मुलगाच होणार हें जवळ जवळ ठरूनच गेलं. कमरु व चिघु बुढा पुन्हा विबट्या वाघासारखे खखरूं लागले. देवाची करणी अशी कीं मायला मुलगाच झाला. मुलाच्या जीवाला कांहीं बरंवाईट होऊं नये म्हणून त्याचं नांव ढोमन्या ठेवलं. चिघु बुढा खुशीच्या चेवांत येऊन म्हणाला,

"आरे, त्याच्या घरीं देर आहे पन् अंधेर नाहीं. गनपतीले म्हना का धडाकून बारसं होऊं दे, जळूं दे दुस्मानायले."

कमरु म्हणाला,

"आरे थो जव्हा देते तव्हा छप्पर फाडून देते." पण मायला ही खुशी कांहीं कळली नाहीं. छप्पर फाटलं ते दुसऱ्याच तऱ्हेनं. ती ढोमन्याला पाजीना. डोळे आढ्याकडे लावून ती कपडे चिवडूं लागली. हरिखानं ती पागल व्हायच्या वेतास आली. बाळंतपणाचे काढे औषधं सगळं झालं. पण मायचं कांहीं विपरीतच. मायला हर्षवायु झाला; ढोमन्या मुळावर आला असं सगळेजण म्हणूं लागले. माय खरोखरच वेडी झाली होती.

मग उपाय सुरू झाले. इंग्रजी औषधांनीं हात टेकले. नंतर रुपरामजी वैद्यानं गांवठी उपाय सुरूं केले. मायच्या अंगावरचे कपडे काढून चिघु बुढा आवाराचं दार बंद करून घ्यायचा. तिला चौरंगावर बसवून कमरु तिच्या डोक्यावर तांब्याच्या घागरी भरभरून पाणी ओतायचा. गणपतराव हे सर्व चिंतेनं पहात उभे रहायचे. माय मघूनच कमरुवर ओरडायची,

"मुसलमानाच्या पोट्ट्या, थांब तुले खातो माहालेका कच्चा. ठंड पानी फेकतस बुढ्याच्या माह्या आंगावर."

ती मधूनच केसांवरून ओघळणारं पाणी निपटून फेंकायची. पाण्याची वेगवान धार सहन झाली नाहीं म्हणजे देवीपुढें झडती देणाऱ्या कोंबडीसारखी थरथर कांपायची. असं पुष्कळ झालं. पण कांहीं ऊद जळला नाहीं. शेवटीं मायच्या हातांत लोखंडी वेड्या आल्या. ती एकटीच दुसरीकडे जुन्या घरीं राहूं लागली.

तिचं वेडहि अजबच. हातांतील वेड्या तडातड तोडून टाकून जवळ जाईल त्याला ती मारत सुटायची. मोठ्या मुली तिला पाहतांच किंकाळ्या फोडून लांब पळून जायच्या. ढोमन्या तेव्हां चार वर्षांचा झाला. त्याचा मात्र तिला फार लळा. त्याला तिची भीति वाटेना. त्याला ती जवळ घ्यायची. हातांतील वेड्यांमुळें ती त्याला हवं तसं जवळ घेऊं शकेना. ती म्हणे,

"ढोमन्या, तुह्या दादाजीले सांग ह्या वेड्या काहाडून टाकाले."

"पन मा, दादाजी म्हंते का तूं त पिशी आहे."

ढोमन्या म्हणायचा.

"तुझ्या दादाजीचं डोक्सं आन तुव्हं चपट नाक." असं म्हणून तिनं त्याचे पटापट मुके घ्यायला सुरुवात केली. तिचे डोळे शिगोशिग भरून आले.

ढोमन्याच्या वडिलाचं दुसरं लग्न झालं तेव्हां ढोमन्या पांच वर्षांचा होता. नवरदेव लग्नावरून आला. ढोमन्याला दुसरी माय आली. पण ती माय नसून आई आहे हे तिनंच सांगितलं. ढोमन्यालाहि तें पटलं. आईनं त्याच्या डोक्यावर जरीची टोपी घालून त्याचा मुका घेतला. हातांत पेढ्यांची पुडी दिली. तिचा मुका शर्टाच्या बाहीनं पुसून टाकीत ढोमन्या तडक मायच्या जुन्या घरीं गेला.

माय हिरमुसली होऊन बसली होती. आज तिच्या हातांत घरीं लग्न आहे या निमित्तानं वेड्या नव्हत्या. त्या काढून टाकण्यांत आल्या होत्या. तिनं शेतांतून बोंड बोंड करून खूपसा मेंगीचा कापूस वेंचून आणला होता. कापसाच्या ओझ्यावर मान खुपसून ती पडली होती.

ढोमन्या आला हें पाहूनहि ती कांहींच बोलली नाहीं. ढोमन्यानें तिला नवी टोपी दाखवीत म्हटलें.

"मा, मले पाह्य वो काय आनलं."

"मले नोको दाखूं. फेकून दे त्याकांठी. आतां तूंहि तिचाच व्हसीन काय रे ढोमन्या? माहा कोनीच नाहीं म्हनाव काय लेक."

असं म्हणून तिनं विचित्र हुंवरडा फोडला. ढोमन्यानें धावरून जावून टोपी व पेढ्यांची पुडी फेंकून दिली. पिवळ्या रंगाचे केशरी पेढे टोपींत जावून पसरले. ढोमन्याचं हें करणं पाहून ती एकाएकी गप्प झाली. तिनं त्याला खस्कन जवळ ओढले. तिनं लगबगीनं चोळीची गांठ सोडली. सुकलेल्या स्तनांच्या बोटण्या तिनं ढोमन्याच्या तोंडांत खुपसल्या. ढोमन्या त्या उगाचच चोखल्यासारखा करूं लागला.

एक दोन चार मिनिटं झालीं. मायची मिठी घट्ट होत चालली. ढोमन्याचा श्वास गुदमरूं लागला. त्याच्या तोंडांतून भीतीची किंकाळी फुटली. तिच्या हातांना हिसडा देऊन त्यानं कशीबशी सुटका करून घेतली. मागे वळून न पाहतां भितीनें घामाघूम होऊन ढोमन्या तडक घराकडे पळाला.

त्या रात्रीं मायनं कहर केला. ती ढाण्या-वाघिणीसारखी चवताळली. सांपडेल त्या बाईला तिनं चांगलं झोडपून काढलं. तिला आवरायला गेलेल्या चिघु बुढ्याला तिनं मोरींत ढकलून दिलं. त्याच्या तोंडांतून रक्त आलं. कमरुला चुलींतल्या जळत्या काडीनं मार दिला. त्या रात्री ती बेभान होवून कुठंतरी निघून गेली. तीस वर्षं झालीं अजून परतली नाहीं.

तेव्हां न गवसलेले अंधुक अर्थ आज ढोमन्याला गवसूं लागतात. तो रमण शिंदे या छानदार नांवानं शहरांतल्या कॉलेजांत मानसशास्त्राचा प्रोफेसर आहे. तो अजून मायच्या शोधांत आहे. •••

## महत्त्वाची सूचना -

**लेखकांसाठीं :** बऱ्याच लेखकांचें "दीपावली" कडे आलेलें व नापसंत ठरलेलें साहित्य आमच्याकडे कांहीं महिने पडून आहे. तें परत हवें असेल तर त्या लिखाणास पुरेसें पोस्टेज लेखकांनीं त्वरित पाठवावें म्हणजे तें त्यांच्या पत्त्यावर रवाना करतां येईल. पोस्टेज पाठविणाऱ्यांसच असें साहित्य परत करण्यांत येईल. अन्यथा तें ताबडतोब निकालांत काढलें जाईल. त्यासंबंधीं पुनः कसलाहि पत्र-व्यवहार केला जाणार नाहीं. नापसंत कविता परत पाठविल्या जात नाहींत याची कृपया नोंद घ्यावी.

—संपादक

अनुक्रमणिका



## सौंदर्य !

तारुण्यांत तिनें प्रवेश केला, आणि जाणते म्हणूं लागले, "हिच्या इतकी सुंदर स्त्री आतांपर्यंत झाली नाहीं व पुढे सुध्दा होईल की नाहीं याची शंका आहे !"

राज्य सिंहासनावर नुकत्याच बसलेल्या तरुण राजाच्या कानावरहि तिच्या सौंदर्याची कीर्ति गेली. केवळ कुतुहलानें त्यानें तिला पाहिले आणि त्या क्षणापासून तो तिच्यासाठीं वेडा झाला. धनवानांच्या अनेक रुप-संपन्न मुली, सौंदर्यशालिनी राजकन्या त्यानें पाहिल्या होत्या. पण या लावण्यलतिकेचें सौंदर्य कांही वेगळेच होते. त्याला तिचा अनिवार मोह झाला. कांही सुचेनासे झाले.

तरुण राजानें तिच्याशीं लग्न केले. रात्रंदिवस तो तिच्या संगतींत राहूं लागला.

तिच्या रुपाचा तिला विलक्षण गर्व चढला. राजा आपल्या मुठींत आहे या जाणिवेनें ती सर्वांशीं तुच्छतेनें, उर्मटपणानें वागूं लागली. तिच्या सौंदर्यावर लुब्ध झालेला राजा तिच्या निर्बुद्धतेकडे, उद्धटपणाकडे कानाडोळा करूं लागला.

कालांतरानें तिचें सौंदर्य ओसरलें. तिची अंगकांति कोमेजूं लागली. चेहऱ्यावरची टवटवी कमी झाली. तिचे उन्मादक डोळे थिजल्यासारखे दिसूं लागले आणि राजा-लाहि हळुहळू तिच्या स्वभाव दोषांची जाणीव होऊं लागली.

राजाचें राणीबद्दलचें आकर्षण कमीं होऊं लागलें या गोष्टीचा व वस्तुस्थितीचा परिणाम तिच्या परिवाराच्या वागण्यावरही होऊं लागला. पण तिच्या जळफळाटाकडे कोणीच लक्ष देईना.

सौंदर्य हेंच एकमेव भांडवल असलेल्या त्या रुपगर्वि-तेला कळेना कीं आपल्या जीवनांत ही शोकांतिका कां निर्माण व्हावी ?

## धन्वन्तरी

साऱ्या देशांत धन्वन्तरी म्हणून त्यानीं लौकिक संपा-दन केला होता. त्याना 'संजीवनी' साध्य झाली आहे असे सर्वजण म्हणत आणि खरेंच होतें तें ! असाध्य समजला जाणारा रोग त्यांच्या विनामूल्य औषधयोजनेनें बरा होई. त्यांच्या झोपडीपुढे राव–रंक लहान–थोर.. श्रेष्ठ कनिष्ठ सर्वांची नेहमी गर्दी असे.

मोठ मोठ्या धनिकांनीं त्याना शहरांत येण्याचा आग्रह केला, पण ते म्हणत.

"माझी झोपडी सोडून मी कुठेंच जाणार नाहीं !"

—रं. कृ. चिंचलीकर












'A man is as old as he feels!'
' — and woman?
'a woman is as old as she looks!'

—कोर्टातल्या एका विचित्र खटल्यांतली हीं प्रश्नोत्तरें !
—कसला खटला हा ?
बलात्काराचा !
घडलेल्या कीं न घडलेल्या ?—खरं काय तें तुम्हीच ठरवा ना !

'हूं. सांग पाहूं नीट एकदां सगळें'. चहाचा शेवटचा घोट घऊन कप खालीं ठेवीत, अॅडव्होकेट वसंतराव बांबूरकर उद्गारले.

त्यांचा जिवलग मित्र नानू गायतोंडे, म्लान चेहऱ्यानें त्यांच्यासमोर बसला होता. नेहमीं हंसत खिदळत येऊन वसंतरावांच्या मांडीला मांडी लाऊन बसणारा नानू आज जाजमाच्या बैठकींवर एकाद्या पक्षकाराप्रमाणें बसला होता —

'काय सांगूं कर्माची कथा — वसंता, मी एका फार मोठ्या पेचप्रसंगांत सांपडलो आहे रे — तूं आणि वहिनी काश्मीरच्या प्लेझर ट्रिपला निघून गेलात, त्यानंतर दुसरेंच दिवशीं मला अटक झाली — नसती आफत — म्हणे मी एका तरुण मुलीवर बलात्कार केला — शेजारीं रहात असलेल्या रहाळकरांच्या रितावर — आतां तूंच सांग शक्य आहे कां वरं हें ! कमी अधिक चाळीशी ओलांडलेला माणूस मी. माझ्या मुलीसारखी रिता — सोळा सतरा वर्षांची पोर...'

नानू कळवळून बोलत होता. "रोजच्याप्रमाणें रिता संस्कृतमधल्या कांहीं डिफिकल्टीज विचारावयास आली होती — दिवसभराच्या अभ्यासाच्या ताणानें थकली होती बिचारी — परीक्षा जवळ आली होती ना ? — एकाएकी गप्पकन् डोळे मिटले तिनें, अन् काय ? खालींच कोसळली एकदम्. तोंडावर पाणी शिंपडलें, आली जराशानें शुद्धीवर — 'आतां वाचायचें पुरें कर, जाऊन नीज जा' म्हणून सांगितले मी तिला — गेली ती. बस. एवढेंच —"

'इतकेंच ?'

'होय रे. इतकेंच — वाटेल त्याची शपथ घेऊन सांगतो. माझ्या हातून 'तसें' कांहींहि घडलेलें नाहीं. माझ्यावर विश्वास ठेव — तुझ्याशीं तरी निदान मी खोटें बोलणार नाहीं — मला माहीत नाहीं कां वकील आणि डॉक्टर —' नानूचा कंठ दाटून आला होता. डोळ्यांतून अश्रु घळाळत होते —

'बरं, तूं जा आतां. सारे कागदपत्र आणून दे रात्रीं, पहातो मी — आणि कांहीं काळजी करूं नकोस —

* * *

वसंतरावाची खात्री होती — नानूच्या हातून हें असलें घाणेरडें कृत्य कदापिही होणार नाहीं. ते लहानपणापासून त्याला ओळखत होते. अत्यंत सद्प्रवृत्तीच्या, नीतिमान आणि निरागस अंतःकरणाच्या नानू 'पंडीत'वर हें भलतेंच बालंट आलेलें पाहून त्यांना फार वाईट वाटले. धक्काच बसला त्यांना. एका वैदिक ब्राह्मण कुटुंबांत जन्म पावलेला, कॉलेज शिक्षणानें सुसंस्कारित झालेला, आणि मिशनरी साहेब मडमांना मराठी आणि संस्कृत शिकविण्यांत गेलीं पंधरा सोळा वर्षे घालविलेला, 'पंडित' नानू गायतोंडे, 'असें' कधींच करणार नाहीं, हें तें पूर्णपणें जाणून होते — आतां हें खरें की वागण्यांत नानू थोडा भडक होता, उधळ्या होता, नटण्या मुरडण्याची, भारी भारी फॅशनेबल कपड्यांची, उंची सुवासिक तेलें आणि अत्तरें वापरण्याची, कँपांत जाऊन इंग्रजी पिक्च



## —डॉ. रंगनाथ देशपांडे

पहाण्याची, त्याची माफक हौस कधीं कधीं उघाणून येत असे — कां येऊं नये ? दीडशें रुपये पगार, आणि एकटा जीव, सदाशिव — निरनिराळे पोषाख करून गांवभर हिंडण्याची नानूला फार हौस — कधीं शिकारी 'हंटिंग ड्रेस' — हातांत हरणाच्या तंगडीचा चाबूक, डोकीवर 'माऊंटी कॅप' — थोडीशी डाव्या कानावर कललेली – कधीं ग्रे-फ्लॅनेलची पँट, हातांत टेनीसची रॅकेट, खिशांत गोल्डन फ्लेकचें पॅकेट – तर कधीं बाह्या दुमडलेला नुसताच मलमलीचा शर्ट आणि जॉन पीलच्या अति तलम धोतराचा उलटा काचा मारलेला – साहेब लोकांच्या संगतींत राहिलेला नानू पंडित, एप्रिल मे मध्यें महाबळेश्वर, माथेरान, उटी, कोडाई कॅनॉलला जाऊन रहाणारा हा 'पंडित' – स्वारी हौस मौज करीत होती – पण ती सारी निरागस आणि निरोगी अंतःकरणाची होती. 'छे, कांहीं झालें तरी नानूला या गैराब्रूच्या खटल्यांतून बचावलेच पाहिजे' — वसंतराव नानूला रोज रात्रीं घरीं बोलावून घेऊन, त्याच्याकडून जबानीचे घडे पाठ म्हणवून घेऊं लागले —

★ ★ ★

नानू गायतोंडेची केस 'सेशन कमीट' झाली होती. खटला ऐकण्यास विलक्षण गर्दी झाली होती. सरकारी वकील गेंगजे यांनीं आरोपी नानू गायतोंडे यास कांहीं मामुली प्रश्न विचारण्याची कोर्टास परवानगी मागितली होती "कर नाहीं त्याला डर कशाला – माझी 'स्लेट' कोरी आहे — वकीलसाहेबांनीं मला वाटेल तितके प्रश्न विचारावेत — शपथेवर मी सांगायला तयार आहे — पाहिजे तर तसें मी लिहून देतो —" असें नानूनें खणखणीत स्वरांत कोर्टास सांगितले —— नानूच्या वकिलांनीं — बांबूरकरनी — नानूची सरतपासणी केली – मग प्रॉसीक्यूटर गेंगजे अंगावरचा काळा गाऊन सावरीत उभे राहिले – प्रथम 'कोर्टा'कडे आणि नंतर आरोपी नानू गायतोंडेकडे एक भेदक दृष्टिक्षेप टाकून त्यांनीं प्रश्न विचारण्यास सुरवात केली —

"तुमचं वय काय म्हणालात मिस्टर गायतोंडे ? चाळीस नाहीं का –"

"होय –"

"इतकं कांहीं दिसत नाहीं हो तुमच्या चेहऱ्यावरून — मला तर पंचविशीच्या बेतांतले दिसता तुम्ही – कम जास्त अठ्ठावीस, तीस —"

"येस् – जीवनाकडे पहाण्याच्या दृष्टिकोनावर सारं अवलंबून असते– आणि दुसरं असं की, a man is as old as he feels !"

'And woman?

'— and a woman is as old as she looks.' नानूनें सुरवातीलाच आपल्या विद्वत्तेचा एक किस्सा गेंगज्याच्या तोंडावर फेकला.

'मग आतां असं पहा मिस्टर गायतोंडे, रिता रहाळकरचें वय काय असूं शकेल – तुमच्या या आत्ताच्या तत्त्वप्रणालीप्रमाणें —'

नानूनें किंचित् विचार करून आढ्याकडे पहात उत्तर दिलें 'सुमारें पंचवीस'–

हो पंचवीस सहजच. उंचीपुरी हाडस अंगाची, गुबगुबीत बांध्याची पसरट पण कमानदार तळव्यांची, विस्तृत पाठीची, मागून पाहिले, तर कुणीही रिता रहाळकराला पंचवीशीचीच म्हणेल — सात आठ वर्षे सहज खाऊन जाईल ती – 'हो. पंचवीसच —'

"मग आतां असं पहा पंडित, तुम्ही पंचविशींतले, तीहि पंचविशीतली व्यवहारी दृष्टीनें दोघेही समवयस्कच — I mean for practical purposes खरं ना ?

'होय.' नानूनें खिशांतल्या रुमालानें तोंडावरचा घाम पुसला —

'म्हणजे तुम्ही जो जीव तोडून एकसारखा अट्टाहास चालवला आहे– कीं रिता रहाळकर मला माझ्या मुलीसारखी — त्यांत कांहीं फारसा अर्थ दिसत नाहीं – तुमच्या आत्तांच्या 'शास्त्रीय वचनाप्रमाणें'–?"

नानू गप्प राहिला —

'बरं, ते राहूं द्या. तुम्ही अद्याप ब्रह्मचारी आहांत ना –?'

'होय –'

'म्हणजे लग्न झालेंच नाहीं का –'

काय हा वेड्यासारखा प्रश्न ! हजारो सुंदर मुलींचें मोहोळ माझ्या भोवतीं उठलें होतें – या मूर्खाला काय त्याची कल्पना —

'म्हणजे मला असं म्हणायचंय कीं, सुरवातीला तुम्ही लग्न 'केलें' नाहीं — फार ताठ्यांत होता तुम्ही त्यावेळीं – आणि मग पुढें पुढें तुमचें लग्न 'झालें' नाहीं – होऊंच शकलें नाहीं – आणि नंतर तर तुम्ही लग्नाची धास्तीच घेतलीत – असंच ना ?'

"...कोहो, बोलत कां नाहीं — घाबरलांत ? सॉरी अं मिस्टर गायतोंडे – मला फक्त एवढेंच म्हणायचं आहे कीं, हें ब्रह्मचर्य तुमच्यावर लादलं गेलं आहे – हा ब्रह्मचर्याचा सूळ स्वतःच्या खांद्यावर तोलून, पेलून घरण्यांत तुमच्या आयुष्याचा हावडा झाला आहे—Our sweetest songs are those that tell of saddest thoughts. खरंना ? ...बऽऽरं, ते जाऊं द्या. आपण आतां थोडेंसे पुढं सरकूं अं मिस्टर गायतोंडे – म्हणजे 'डीटेल्स ऑफ् दि केस' –"

'येस् येस्...' नानू तोंडावरचा घाम पुशीत म्हणाला —

'आतां असं पहा –'

हें काय बोवा याचें सारखें आतां असं पहा – आतां असं पहा —

"असं पहा – तुमच्या खोलीचें जरा वर्णन देतां का – घटनास्थळाचें. गुन्हा घडला त्या जागेचें–वास्तूचें वास्तव दर्शन —"

"काय बोलता हें तुम्ही – माझ्या हातून कसलाच गुन्हा घडला नाहीं" – नानू जरा चढत्या आवाजांत बोलला. चांगला डाफरलाच तो गेंगज्यावर —









अनुक्रमणिका

"Description of the room, please मिस्टर गायतोंडे –"

'पंचवीस बाय् बाराची खोली. पूर्वेला रस्त्यालगत तीन मोठाल्या खिडक्या – पिळाच्या गजाच्या. रंगीत चिकाचे पडदे सोडलेले – उन्हाळयांत वाळयाचें — सीझनप्रमाणें रंगीबेरंगी जाळीदार कापडाची 'ड्रेपरी' सोडलेली —'

'त्या रात्रीं कोणता रंग होता — खिडक्यांच्या पडद्यांना!' गेंगज्याच्या चेहऱ्यावर सहीसही मिस्किलता विलसत होती.

'गुलमुशी'

'खोलीच्या दाराला, आंतल्या बाजूनें – म्हणजे दार बंद केल्यावर – कडी लावल्यावर – जो काचमण्यांचा पडदा सळ्ळकन् खालीं येतो, त्याच्यावर कोणतें वरे चित्र आहे?

'पद-रंजन – एका सुप्रसिद्ध बंगाली चित्रकाराच्या, गाजलेल्या कलाकृतीवरून घेतलें आहे तें–'

'एक अजरामर कलाकृति-गद्य काव्य सत्यम् शिवम् सुंदरम्'चें–

"घादांत साक्षात्कार —"

"लिहिण्याच्या टेबलाच्या वरच्या बाजूला भितीवरील चित्रें —"

'ओलेती —'

'दुसरें —?'

'प्रणयिनीचा मनोभंग'— दोन्हीहि – कलाकृति गाजलेल्या — महशूर रंगसंगतीचे उत्कृष्ट नमुने

'ठीक, ठीक — आतां असं पहा पंडित — मिस्टर गायतोंडे, 'पंडित' म्हणून तुम्हाला संबोधलं, तर तुमची कांहीं हरकत नाहीं ना..?'

'ओ नो – नॉट ॲट ऑल – गोऽहेड् – that's a feather in my hat.'

'पंडीतजी – त्या ओलेतीच्या चित्रासमोर, म्हणजे पलंगावर पहुडले असतां, समोरच्या भितीवरील सतत हालत रहाणाऱ्या आरशामध्यें चपखलपणें प्रतिबिंबित होणारें कोणतें वरं चित्र तें —'

"हां हां तें! राजा रविवर्म्याचें? लुगडें नेसत असलेली एक पुरंध्री -'

'हो. तेंच. समोरच्या हालत्या आरशांतील ती डोलती परी. तोंडासमोर येऊन एकसारखी त्रास देणाऱ्या भुंग्याला, ती हातानें झटकतें आहे, त्या नादांत, तिच्या हातांतील तोपर्यंत कशातरी आवरून सावरून धरलेल्या लुगड्याच्या निऱ्या सुटल्या आहेत–आणि याचें तिला मुळींच भान नसतें. त्यामुळें त्या तरुण स्त्रीचें शंखिनीच्या घाटदार कटी भागाचें करवटतें आणि पिळवटतें दर्शन – चित्रांतील तो भुंगा सुद्धां कसा टवकारून पहात असलेला दाखविला आहे. नाहीं का पंडितजी–'

"भुंग्याला नाहीं वोवा मी इतकें न्याहाळून पाहिले–"

"बरं असूं द्या तें– पुढें खोलीची जमीन–"

"मिस्टर गेंगजे, या साऱ्या 'डीटेल्स'ची काय जरुरी? कोर्टानें कपाळाला आठचा घालीत विचारलें. तशी माझी हरकत नाहीं– पण काय, जरुरी काय–"

'युवर ऑनर– फार जरुरी– मी येतोच आतां त्यावर–'

'ऑल राईट – कॅरी ऑन् – प्रोसीड-'

'जमीन मोझेईक तुकड्याच्या चुऱ्यानीं प्लॅस्टर केलेली – माझ्या स्वतःच्या खर्चानें–'

'बऽऽरं- पलंग?'

'शिसवीचा–घोटीव.'

'डबल?'

'होय – ऐसपैस मोकळे ढाकळें पडल्याशिवाय शरीरांतील 'टिशू'चें 'रिलॅक्झेशन' होत नाहीं–'

'गादी? दुलई–'

"गादीची बनावट अशी आहे की, सुलट बाजूनें, मऊ मऊ–"

'म्हणजे, स्पंजासारखी – अगर पावासारखी – काय?'

'वा. वा. छान, छान – आणि उलट बाजूनें ताठर, दाठर, आटुसताणाची— दुलई, फत्तेगडी कलाबतूची–'

'आच्छा. आतां असं पहा मिस्टर गायतोंडे– माझं काम झालंच आहे बहुतेक. फक्त एकदोन मामुली प्रश्न–'

'ओय्येस्–जरूर–'

'–ज्या रात्रीं तुम्ही रिता रहाळकराशीं अतिप्रसंग केला'

'अहो, काय बोलता तुम्ही हे वकीलसाहेब – जिभेला कांहीं हाड तुमच्या. तसलं कांहींहि माझ्या हातून झालेलं नाहीं–'

कोर्टांत एकच हंशा पिकला.

'आर्डर, ऑर्डर–' क्षणांत शांतता पसरली.

'– किती, अकराचा सुमार होता, नाहीं ?'

'साडेदहाचा–' नानूनें गुरगुरत उत्तर दिलें.

'युवर ऑनर – आरोपीच्या या उत्तराची आवर्जून नोंद घ्यावी.'

'ते तुम्ही सांगण्याची जरुरी नाहीं मिस्टर गेंगजे-'

'सॉरी I beg your pardon Sir —'

'ऑल राईट–गो ऑन्.'

'आतां असं पहा मिस्टर गायतोंडे–त्यावेळीं वाड्यांतली सारीं माणसें विशेषतः रिताच्या घरचीं–गणपती उत्सवाची आरास पहाण्यास गेली होती. वाड्यांत आगीलदारीं सारें सामसूम होतें. रात्रीची वेळ. भरपूर एकांत. खोलींत निळसर रंगाची आराशी पसरलेली. रिता रहाळकर आणि तुम्ही. एक समवयस्क तरुण-तरुणी एका रंगमंचावर शोभेल अशा दिवाणखानावजा बंदिस्त खोलींत गप्पा छाटीत बसला आहांत.'

'गप्पा छाटीत बसलो नव्हतो आम्ही. रिता मला संस्कृत श्लोकांचा अर्थ विचारीत होती–'

'कोणते श्लोक ? शांकर भाष्य–शतश्लोकी, पंचदशी, का ब्रह्मसूत्र–'

पुन्हा कोर्टांत हंशा. पुन्हा न्यायाधिशाचें 'ऑर्डर ऑर्डर' आणि लगेच पुन्हा शांत.

'हर्षाची रत्नावली. कालिदासाचे शाकुंतल, मेघदूत–'

'हो–तीं पाहिजेतच-'

'पाहिजेतच म्हणजे ! अहो रिताच्या परीक्षेलाच नेमली होती. 'टेक्स्ट' म्हणून'–

'अच्छा अच्छा. त्यावेळचा एकादा श्लोक आठवतो का आतां–'

"हो होः 'कृच्छ्रेणोसयुगं व्यतीय...'' नानूनें रत्नावलीतला तो श्लोक घडघडा म्हणून दाखविला.

'श्लोकाचा अर्थ–'

'एका तरुण स्त्रीच्या–'

'प्रौढ पुरंध्रीच्या–रविवर्म्याच्या त्या चित्रांतल्यासारख्या–'

'होय–अंगोपांगाचें वर्णन आहे तें–पण त्या वर्णनापेक्षां, खडबडीत पण-रम्य उपमांच्या सहाय्यानें कवीनें, एका भटक्या पांथस्थाची तृषार्तता मोठ्या बहारीनें वर्णन केलेली आहे–कालीदास म्हणजे काय महाराजा कालीदासच तो–'

नानू रंगांत आला होता–

'थांबा जरा अं मिस्टर गायतोंडे – हा अर्थ रिता रहाळकरला सांगतांना तुम्ही कुठं उभे होता ? नीट आठवून सांगा अं–पंडितराय–''

'तिच्या मागे–खुर्चीला टेकून–'

'ती पुस्तकांत पहात होती. थोडी पुढें झुकली होती. तुम्हीहीं थोडे पुढें झुकला होता– खरं कीं नाहीं–'

'होय. माझ्या डोळ्यांवर चष्मा नव्हता म्हणून–'

'त्यावेळीं तुम्ही रिताच्या सैल पडलेल्या पोलक्यांतून आंत कांहीं तरी न्याहाळीत होता की नाहीं–खरं सांगा–'

'न्याहाळीत नव्हतो मी. सहज दृष्टि गेली. अटळपणें–' नानूनें कपाळावरचा घाम पुसला–

"आतां असं पहा– कल्पना करा मिस्टर गायतोंडे–कीं, रिता रहाळ-करसारखी–हाडस अंगाची, शामलवर्णा, सुरेख दांतांची, कृश कटी, विस्मित हरीणीचें नेत्र लाभलेली, 'निम्न नाभि'—''

'रिताची नाभि मला कशी दिसणार ? कांहींतरीच काय बोलता मूर्खासारखें' नानू भडकला.

'युवर ऑनर, हा Contempt of the Court होतो आहे. मी अर्ज देतो–

'मिस्टर गायतोंडे–माफी मागा तुम्ही–' कोर्टानें हुकूम सोडला. नानूनें माफी मागितली.

'युवर ऑनर, मला असं म्हणायचंय कीं श्लोक समजाऊन सांग-ण्याच्या मिषानें आरोपी जो पुढें पुढें सरकून, अणि वाकून पहात होता, ते रिता रहाळकराच्या नाभी स्थानाचा–श्लोकांमधील त्रिवल्लींचा वेध घेण्यासाठीं काय मी म्हणतो मिस्टर गायतोंडे–?'

–अरेच्या. खरंच कीं. त्यावेळीं नाहीं आपल्या लक्षांत आलें हें–

'होय' नानूनें डोळे मिटून घेतले होते. आपल्या उजव्या हाताच्या तर्जनीनें तो हवेमध्यें उभी रेघ काढीत होता. त्याच्या कानाच्या पाळीमागे घर्मबिंदू उमटले होते–कसल्यातरी गूढ आणि अनुनुभूत आनंदाची–ब्रह्मानंद सहोदराची–लकेर त्याच्या चेहऱ्यावर 'चढूं लागली होती–

'मिस्टर गायतोंडे, आतां आपण जरा आणखी पुढें सरकूं अं ?'



"लाज वाटायला हवी, असलें कुकर्म करायला."

अनुक्रमणिका



# माझी आई

कवयित्री : **एली इआनिदो**

अनुवादक : **रॉक कार्व्हालो**

**तुळशीच्या झाडाच्या सांवलीचं**
**होतं तुझं पांघरूण;**
**तूं हलविलेस पर्वत,**
**ओलांडल्यास नद्या**
**नि घेऊन आलीस माझ्यासाठीं**
**गोंजरता स्पर्श,**
**घेऊन आलीस दिव्य आकाशपुष्प!**
**कोरीन मी तुझीं दुःखं**
**गुलाबाच्या पानांवर.**

**तूं आई बालकांची,**
**आई पक्ष्यांची,**
**आई फुलांची, आई माझी!**
**आई शाळकरी मुलांची,**
**आई युद्धकैद्यांची.**
**आई श्रमिकांची, आई माझी !**

**खोललीं गेलीं तुरुंगाचीं कवाडं,**
**सुरू झाली भेटीची वेळ**
**अन् संपलीहि,**
**तूं उभीच आहेस!**
**तुला काय वाटलं ?....**
**मला का खिडकीवाटे**
**उडून बाहेर येतां येईल ?**

**ओळखतात तुला सारे**
**लोखंडी गज नि निशाणीचे दगड;**
**माहीत आहे त्यांना —**
**तूं असायचीस पहांटे पहिली**
**आणि रात्रीं शेवटीं;**
**माया करतांना**
**काळजीं घेतांना पहिली,**
**विसावा घेतांना शेवटीं !**

'येस् ?' नानू डोळे फाडून गेंगज्याकडे पहात होता. दृष्टि डचमळत होती त्याची. लाली चढूं लागली होती तिच्यावर–'नेमकी याच वेळीं; रिता रहाळकर खुर्चीतून खालीं कोसळलीं नाहीं का ?'

'होय, भोवळ आली तिला–अतिश्रमानें–'

'अतिश्रमानें नाहीं मिस्टर. तुमच्या उष्ण आणि मदीर निश्वसितानीं तिच्या कर्णपटलांतील नर्म रंध्रें वडकसलीं म्हणून–'

नानू थोडासा हंसला– मनाला पटलें तें त्याच्या. थोडेंसें आवडलेंही–

'-तिला तुम्ही मग लगोलग उचलून घेतली. दोन्ही हातांवर, आडवी-एकीकडे तिच्या मानेचें केळफूल हिदकळतें आहे. सुकोमल लताशीं स्पर्धा करणारे तिचे दोन्हीं बाहू त्या हिदकळण्याला साद देत आहेत, खालीं झेपावणारा कचसंभार जमीनीवरून रेवाळत चालला आहे– दुसऱ्या बाजूला पायांचे कर्दळी स्तंभ लडवडत आहेत– तुम्ही मग तिला फुलवऱ्या हातांनी आणि आदवत्या आनंदानें पलंगावर ठेवली–"

नानूचे ओठ विलग झाले होते. मान डोलत होती हालत होती. सभोंवतालचे जग तो पूर्णतया विसरला होता– 'पुढें' एवढेंच तो उद्गारला–

इकडे बांबूरकर वकील फारच बेचैन झाले होते. नानूचें लक्ष आपल्याकडे वेधून घेऊन त्याला इशारेवजा सूचना देण्याचे त्यांचे सारे प्रयत्न निष्फळ झाले–नानू पहातोच कशाला त्यांच्याकडे. तो आपल्याच तंद्रींत रममाण झाला होता–त्यांना कळेना–

इतक्यांत 'आऽऽऽच्छा' करून कुणीतरी मोठयानें शिंकले, बाहेर चोहीकडे पुन्हां मोठा हंशा पिकला.

न्यायाधीश साहेब 'आर्डर आर्डर' म्हणून जमावाला जरब देते झाले– "सभ्य गृहस्थहो–हें न्यायालय आहे. क्लब नव्हे. न्यायदानाच्या पवित्र कार्याला जर असा वारंवार अडथळा होऊ लागला. तर तुम्हां सर्वांना बाहेर जाण्यास मला सांगावें लागल. I am sorry to say this — हं मिस्टर, गेंगजे. proceed."

'पंडीतराय–आतां असं पहा पलंगावर रिता रहाळकर अस्ताव्यस्त पडली आहे–

'होय–' नानूनें आपली ओलसर जीभ कोरडया ओठावरून फिरवली.

"तिच्या मुखांतून चीत्कार सुटत आहेत–ती शुद्धीवर आहेही, आणि नाहींही. खोलींत मंदमंद निळसर प्रकाश पडला आहे. हातांतून निसटूं पहाणाऱ्या निऱ्याची मालकीण– चित्रांतील ती कामिनी तुमच्या-कडे–

'आणि त्या भुंग्याकडे–'

'तुमच्याकडे आणि त्या भुंग्याकडे आळीपाळीनें पहात आहे–सारी खोली केवडयाच्या धुंद सुगंधानें दरवळून गेली आहे. पानडीच्या 'परभोगी' अत्तराच्या फायानें तुमचा उजवा कान सुखाऊन गेला आहे.'

'उजवा नाहीं–डावा.' नानू गच्च डोळे मिटून घेऊन बोलत होता–

'बरं, डावा. थँक्यू– मग तुम्ही तिला शुद्धीवर आणण्यासाठीं तिच्या मस्तकावरून, केसावरून हात फिरवूं लागलात. तुमच्या मेंदूत, त्या धुंद अवसरी, कलंदर कालीदासाच्या मेघदूतांतील गंभीरा नदी आणि ढग या प्रियकर आणि प्रेयसीच्या प्रणयक्रीडेला उद्देशून लिहिलेल्या 'त्या मदनमस्त' श्लोकानें वादळ उठवलें आहे – "तस्यां क्विचित्.... ज्ञातास्वादो विवृत जघना... काय पंडित खरं ना ?

'अं, काय, काय म्हणालात– हो– हो– खरं आहे–खरं आहे-' नांनू पंडिताचे डोळे विलक्षण धुंदीनें तळपूं लागले–लाल झाले. बुबळें गरगरा फिरूं लागली– मग काय, गुन्हा कबूल !– कम ऑन् माय फ्रेन्ड– Be a sport !'

"क–कं–कबूल."

नानूला विलक्षण धाप लागली होती. त्यानें आपले तांबारलेले डोळे गच्च मिटून घेतले होते. पुन्हां तो चीत्कारला–,

'कबूल. कबूल–'

• • •

Pratibha

# दांत पडले म्हणून भूक का लागत नाहीं?

द्रव्यार्जनाचा काळ संपल्यानंतरहि पुष्कळ आयुष्य जावयाचे असते आणि ते समाधानांत जावें अशी सहाजिकच प्रत्येकाची इच्छा असते. तथापि त्याची तरतूद फारच थोड्या लोकांनी केलेली असते आणि मग स्वतंत्रपणे राहाण्याची सवय असलेल्यांना आपल्या मुलाच्या राज्यांत ओशाळेपणानें राहावें लागते. मुलें सुस्वभावी असली तरीहि अनेक वेळा कुचंबणेचे प्रसंग येतातच. यावेळीं स्वतःचे जर थोडेसें निश्चित उत्पन्न असेल तर कुणालाहि आपला भार वाटणार नाहीं. असे उत्पन्न नियमितपणे येईल अशी तरतूद करायचा निश्चित व सोपा मार्ग म्हणजे आयुर्विमा. आजच तुमच्या विमा एजंटाचा सल्ला घ्या.



**आयुर्विम्याला पर्याय नाहीं.**



( पान ४२ वरून )

ह्या गिऱ्हाइकांची नेहमी तिथे विशेष गर्दी असायची. सेन्ट्स्, पावडर्स, लिपस्टिक्स् सॉल्ट्स्, इत्यादि चैनीच्या वस्तूंना तिथे फार मागणी असे. माझ्या मित्राच्या दुकानांत चांगल्या क्वालिटीचा माल मिळत असल्यामुळें भारी किमतींत परदेशी वस्तु खरेदी करणाऱ्या लोकांचा दुकानाला चांगला आश्रय असायचा. एकदां दुकानाच्या मागच्या बाजूस पडलेल्या सामानाची तपासणी करतांना सॉल्ट्स्ची एक फुटकी बाटली मला आढळली. रसायनशास्त्राची आणि विशेषता सुगंधाची मला आवड असल्यामुळें मी ती बाटली गुंडाळून घरी नेली. माझा मित्र दोन दिवसांनीं दुकानांत येऊं लागल्यामुळें मला आतां उपस्थित राहाण्याची जरुरी नव्हती. घरींच बसून प्रयोग करण्याच्या हौसेनें मी कांहीं आवश्यक उपकरणें बर्नर वगैरे मागवून घेतला. त्या क्रिस्ट्ल्सचे रासायनिक पृथक्करण करण्यांत दोन दिवस खर्च केल्यानंतर मला एक गम्मत आढळली. त्या फुटक्या बाटलीचे तुकडे मी तसेच ठेवले होते. ते जुळवून त्यावरचे लेबल मी नीट वाचले. त्यावरची एक सूचना मला विचित्र वाटली म्हणूनच माझ्या प्रयोगाची खटपट चालू होती. 'विशिष्ट परिमाणापेक्षां जास्त सॉल्ट्स् स्नानपात्रांत टाकूं नका ते घोकादायक ठरेल' ही लाल अक्षरांतील सूचना खरी असल्याचे माझ्या प्रयोगांनी सिद्ध झाले होते. माझ्या प्रयोगावरून असलीं क्रिस्टल्स् तयार करणें मला सुसाध्य होतें. दुपारीं माझ्या मित्राला ह्या सॉल्ट्स्बद्दल बोलतांच त्यानें मला उलट उत्तेजन दिलें व परदेशी माल येणें दुष्कर ठरल्यामुळे – विशेषतां युद्धांत ह्या 'बाथ सॉल्ट्स्' तयार करणाऱ्या कंपनीवर बॉम्ब पडल्यामुळें ती बेचिराख झाली होती – असली सॉल्ट्स् जर इथें तयार करतां आली तर त्यांना फारच मागणी असल्यामुळें धंदा फोफावेल. माझ्या दुकानाचें नांव मोठे होईल आणि तुलाही बसल्याबसल्या, आवडीचा उद्योग आणि भरपूर पैसाही मिळेल. मित्राचे हे आव्हान मी जिद्दीने स्वीकारलें. देशी कच्ची सॉल्ट्स् आणून त्यांत रंग आणि सुगंध टाकून चित्र-विचित्र रंगाची सॉल्ट्स् प्रथम विक्रीला ठेवली. त्यांचा खप होऊं लागल्यामुळें ह्या विशिष्ट प्रकारच्या मादक सॉल्ट्स्ची निर्मिती सुरू केली. जाहिराती, फलक आणि सवलती जाहीर केल्यामुळें अल्प-काळांतच ह्या महाग सॉल्ट्स्ना देखील भयंकर मागणी आली. मग रसायनांच्या खरेदीसाठीं मुंबई व बंगलोर येथे जाऊं लागलों. मुंबईत ताजमहालमध्यें राहात असतांना तिथल्या दुकानांतही हा माल विक्रीसाठीं ठेवला. तिथे अनेक पाश्चात्य आणि स्थानिक गुलहौशी लोक खरेदीला येत असत....."

"पण आपण कांहीं शोकांतिकेबद्दल सांगणार होतां......." माझ्या तपशीलवार हकिगतीनें कंटाळा आल्याच्या स्वरांत ती तरुणी बोलली.

"आपण हल्लीं अशीं क्रिस्ट्ल्स् बनवतां काय ?" तो तरुण उत्सुकतेनें मला विचारत होता.

"आपल्या दोन्ही प्रश्नांचें उत्तर एकदमच सांगतो. एका शोकांतिके-मुळेंच हा सॉल्टस्चा फायदेशीर धंदा मला बंद करणें भाग पडले. तशी कायद्यानें माझ्यावर बंदी आणण्यांत आली. 'क्लिओपॅट्रा' बाथ सॉल्टस् आपणांस माहित आहेत ?"

"हो, हो हाउ लव्हली ! मला फार आवडायची ती. आतां कुठेंच मिळत नाहींत. स्नानपात्रांत ती टाकली की सुगंधाचा कसा फवारा स्नानगृहांत दरवळायचा. थकलेल्या शरीराला एक प्रकारची सुगंधी गुंगी यायची. आंघोळ करतां करतां झोप लागायची. मला फार फार आवडायची. माझ्याजवळ अर्धी बाटली अजून शिल्लक आहे आणि कित्ती वेळां इच्छा होते पण अगदीं नाइलाजानें मी ती सोन्यासारखी जपून ठेवली आहे माझ्या कपाटांत......" ती तरुणी उत्साहानें बोलत होती.

"त्याच सॉल्ट्स्बद्दल बोलतो आहे मी". मी मध्येच बोललो, "त्याचाच निर्माता आपणांसमोर आहे !"

"काय आपणच ? मग मला एक दोन बाटल्या द्या ना. मी आपले ऋण कधीं विसरणार नाहीं. निदान एक मोठी बाटली तरी आपल्या ह्या भेटीची आठवण म्हणून———" अनवधानानें ती तरुणी बोलून गेली.

"एकच काय शंभर बाटल्या दिल्या असत्या. पण आतां तें शक्य नाहीं. कायद्यानें ती सॉल्ट्स् विकण्याची आणि तयार करण्याचीही बंदी माझ्यावर आहे. आणि ह्याला कारण ती मुंबईतली ट्रॅजेडी. सगळा माल जप्त केला पोलिसांनीं. तुमच्याजवळच्या बाटलीची कुठें वाच्यता करूं नका नाहीं तर तीही जप्त होईल." मी म्हणालो.

"काय झालं मुंबईला ?" तो तरुण आतां विचारत होता.

"मघांशी मी सांगितलें कीं मुंबईत गेलो की, ताजमहालमध्यें मी राहत असे. तसे माझे अनेक बंगले–मोटारवाले स्नेही मुंबईत आहेत. पण मला कसली बंधनें आवडत नाहींत आणि माझ्या अनियमित कार्यक्रमामुळें कुणाला उपद्रव देणेंही मला प्रशस्त वाटत नाहीं. 'ताज' महाग पडते खरे पण तिथला उफाळणाऱ्या दर्याचा आणि डोलणाऱ्या नौकांचा देखावा मला फार आवडतो. शिवाय तिथले स्टोअर्स हे माझे बडे गिऱ्हाईक आहे. माझा मुंबईचा कार्यक्रम उरकला. दुसऱ्या दवशीं मला पुन्हां सिकंदराबादला जावयाचे होतें. संध्याकाळी स्ट्रॅन्ड रोडनें फिरत फिरत मी ताजमध्यें परतलो. आठ वाजण्याच्या सुमारास मी स्टोअर्सकडे पोचलो. तिथला मॅनेजर हिशेब करण्यांत गुंग होता म्हणून सहज 'इव्हिनिंग न्यूज' उचलून काउंटरजवळ बसलो. आजुबाजूने आंत बाहेर करणारी जोडपीं दुकानांत डोकावत होती. मॅनेजरचे काम संपलें आणि त्यानें हांक मारल्यावर त्याच्या टेबलाशीं मी जाऊन बसलों. किंचित् उन्हाळा वाटत होता म्हणून मी कोट काढून खुर्चीवर टाकला होता. मॅनेजरने लाइम् स्क्वाशची ऑर्डर दिली. आम्ही व्यवसायाच्या गप्पा मारीत होतो. सेल्स्मन्नीं काउंटर बंद करण्यास सुरवात केली त्यावेळेला लक्षांत आलें की साडेआठ होऊन गेले म्हणून. चाव्या ठेवून ते निघूनही गेले. आतां दुकानांत फक्त आम्ही दोघे उरलो होतों. मॅनेजरनें टेबलाचे खण बंद केले आणि आम्ही निघणार तोच एक अद्यावत् पोशाख केलेला तरुण घाईघाईने आंत आला. मॅनेजर त्याला 'स्टोअर्स बंद झाले' असे सांगणार तोच त्याने 'शॅनेल'च्या मोठ्या बाटलीची चौकशी केली. महायुद्धानंतर अशा महागाईचें सेन्ट मागणारा वेडा पीरच असला

अनुक्रमणिका








पाहिजे. सत्तर पंचाहत्तर रुपयांची सेन्टची बाटली वापरणें हे भल्या-भल्यांच्या आटोक्यावाहेरचें होते. माल मिळत नव्हता त्यामुळे सर्व सेन्ट्सचे भाव सात आठ पटीने वाढले होते. जुन्या खरेदीचे सेन्ट विकण्याची ही संधि गमावणें मॅनेजरला सोपें नव्हतें. त्यानें कपाटांतून ती बाटली काढली आणि गिऱ्हाइकानें किमतीची चौकशी केली नाहीं म्हणून बिल करतांना आणखी पांच रुपये वाढवले. शंभराची नोट टाकून बेफिकीरीनें त्यानें वॉक्स खिशांत घातले आणि 'चेन्ज' मिळतांच तो बाहेर निघाला. पण तावडतोव कांहीं आठवल्यासारखे वाटून तो परत फिरला आणि त्याने 'बाथ क्रिस्ट्ल्स्'ची चौकशी केली. एक दोन नमुने दाखवतांच त्यानें सर्वांत महाग 'क्लिओपॅट्रा'ची गार्डेनिया वासाची क्रिस्ट्ल्सची बाटली उचलली आणि सांगितलेली किंमत देऊन 'थँक्स' मानून तो बाहेर गेला. 'क्लिओपॅट्रा'च्या निवडीबद्दल मला अभिमान वाटला आणि मॅनेजरनेंही माझ्या सॉल्ट्सच्या लोकप्रियतेबद्दल माझे अभिनंदन केले. आम्ही बाहेर आलो आणि पठाणानें रोलिंग शटर्स ओढून दुकान बंद केलें. पायऱ्यापर्यंत मी मॅनेजरला सोबत केली, आणि 'गुडबाय्' म्हणून त्याचा निरोप घेऊन मी जिना चढून वर लाउंजच्या दिशेने निघालों."

बोलतां बोलतां घशाला कोरड पडली म्हणून मी पाण्याचा ग्लास उचलला आणि एकदोन घोट घेऊन पुढें सांगू लागलो.

"त्या रात्रीं मला झोपेंत एक भयंकर स्वप्न पडलें आणि घामाघूम होऊन मी जागा झालों. घशाला कोरड पडली होती. बेडस्वीच दाबून मी दिवा पेटवला आणि पाणी पिऊन क्षणभर मी खिडकींत उभा राहिलों. बाहेर रस्त्यावर स्मशानशांतता होती. गेटवेपर्यंत कुठेच हालचाल दिसत नव्हती. समुद्राच्या लाटांचा आवाज मात्र कानीं पडत होता. दूरवर समुद्रांत बोटीचे लुकलुकणारे दिवे दिसत होते आणि खडकांवरची दीपगृहें प्रकाश मिचकावत अंधारांचा छेद अधून मधून करत होतीं. मी दिवा बंद करून पुन्हां बेडवर येऊन पडलो. त्या स्वप्नाचा परिणाम अजून विरला नव्हता—"

"कसलें स्वप्न ? इतके भयंकर होते का तें ?" त्या तरुणीनें पृच्छा केली.

"नुसतें भयंकरच नाहीं, सूचकही होते तें. एका, स्नानगृहांतल्या संगमरवरी स्नानपात्रांत एक बाई स्नान करीत होती. माझ्या 'क्लिओपॅट्रा' क्रिस्ट्ल्सची जाहिरातच जणूं जिवंत वाटत होती. होय ! बरोबरच बाजूच्या स्टुलावर 'क्लिओपॅट्रा'ची बाटलीही दिसत होती—जाहिरातीसारखीच. क्षणभरानें त्या वाफेच्या धुक्यांत ती दिसेनाशी झाली. त्या बाथमध्यें जणूं गुंगीत पडल्याप्रमाणें ती निस्तब्ध होती. तिचा देह पाण्यांत खालींखालीं सरकत चाललेला मला दिसतांच मी मोठ्यानें ओरडलों. 'जागी हो जागी हो' म्हणून तिला हांकही मारली. पण निरर्थक. क्षणांत ती बाथमध्यें पाण्याखालीं अदृश्य झाली. वाफेचे ढग तिला गुरफटून टाकत होते. गेली-गेली-गेली. वांचवा—वांचवा—वांचवा म्हणून मी ओरडण्याचा यत्न केला पण भीतीनें घशांतून आवाज फुटला नाहीं. आणि मी एकदम दचकून जागा झालो. जणूं मीच बुडालो होतो अशा भीतीनें मला घाम फुटला होता."

"पण ह्यांत सूचकता कसली आली !" ती तरुणी मध्येंच बोलली. तिचा पति सिगारेट ओढत निर्विकारपणें बसला होता. त्याच्याकडे नजर वळवून मी म्हणालों—

"—तीच तर सांगतो. माझ्या व्यवसायाचा आणि फायदेशीर उपक्रमाचा अंत होण्याची पूर्वसूचना जणुं ह्या स्वप्नानें स्पष्ट केली होती. रात्रीच्या जागरणानें अंग अवघडून आले होते. तरी मला पहांटे विमान पकडावयाचे असल्यामुळें मी उठलो. नोकराला चहा व ब्रेकफास्टची ऑर्डर दिली. लवकरच चहा आला. मी ब्रेकफास्ट उरकून तोंड धुतले आणि कपडे चढवून खाली निघालो. जातांना वेटरला टिप्स् दिल्या. 'ताज'मध्यें त्यावेळी नीरव शांतता होती. फरशीवरचा माझ्या बुटाचा आवाज तेवढा घुमत होता."

"सिकंदराबादला मी आल्याच्या तिसऱ्या दिवशीं माझ्या घरीं पोलिस आलेले पहातांच माझा मित्र आणि मीही दचकलो होतो. पोलिस इन्स्पेक्टर अदबीनें सर्व हकिगत सांगत होता. 'ताजमहाल'—मध्यें तीन दिवसांपूर्वी एक अपघात झाला होता. एक स्त्री टबमध्यें स्नान करतांना पाण्यांत मृत झालेली आढळली. तिच्या मृत्यूचें कारण उमजलें नाहीं. चौकशी करतां खोलींत 'क्लिओपॅट्रा' क्रिस्ट्ल्सची बाटली सांपडली. तिच्या लेबलावर 'काळजीपूर्वक आणि योग्य प्रमाणांतच वापरा. प्रमाणाबाहेर उपयोग केल्याने मूर्छा येण्याचा संभव आहे' असे लाल अक्षरांत छापलेले आढळले. कंपनीचा पत्ताही लेबलावर होता. त्यावरून पोलिस चौकशीसाठीं आले होते."

"दुसऱ्या दिवशीं मला मुंबईला जावें लागलें. कॉरोनरच्या कोर्टांत वकिलाच्या प्रश्नांना उत्तरें देतां देतां मी चिडून गेलो. मृत्यूच्या कारणाचें नीटसें अनुमान झालें नव्हतें. पण क्रिस्ट्ल्स् उपयोगामुळें गुंगी आली असल्याचा तर्क होता. आणि त्या गुंगीनेंच मृत्यु आला असावा असे सूचित करण्यांत आले. माझ्यावर प्रत्यक्ष आरोप ठेवला गेला नाहीं. तरी कॉरोनरच्या निकालामुळें 'क्लिओपॅट्रा' सॉल्ट्स् तयार करण्याची आणि विकण्याची बंदी माझ्यावर लादली गेली. दुकानांतला माल जप्त करून नष्ट करण्यांत आला." माझी कथा संपली असें वाटून तो तरुण बोलला, "बस्स, इतकेंच ?"

"म्हणजे हें कांहींच झालें नाहीं वाटते. माझा किफायतशीर धंदा

अचूक नेम !



—थांबा ना, माझ्या प्रियकरा, त्यांना गोळी मारूं दे.....






बरबाद झाला. त्या स्त्रीनें निष्काळजीपणानें मृत्यु ओढवून घेतला. कोटींत मला तिचा तो 'भाऊ' दिसला – तोच तो – त्या रुबाबदार सुटांतला. स्टोअर्समध्यें त्या रात्रीं 'शॅनेल' विकत घेणारा. मला पाहतांच तो घाबरला होता. मी ओळख दाखवीन म्हणून अस्वस्थ झाला होता. पण मी कांहींच बोललो नव्हतो. निष्कारण लफड्यांत कशाला पडा म्हणून मी गप्प बसलों आणि चौकशी संपल्यावर सिकंदराबादला परतलो. आतां फक्त आइस्क्रीमचे इसेन्सेस बनवतो आणि क्वचित् कोणी गळ घातली तर सेन्ट्स् पण अगदीं खाजगींत. तें स्वप्न पुन्हां कधीं कधीं माझ्या डोळ्यांसमोर येतें आणि सुगंधाच्या शौकाला बळी पडलेल्या त्या गौरकाय निरपराध मुलीच्या आठवणीनें मन कासावीस होतें." असे म्हणत मी सुस्कारा सोडला.

ती शोकांतिका ऐकून वातावरण गंभीर झालें होतें. ती तरुणी विचारांत पडली होती. अचानक तो तरुण उठला, 'बहोत देर हो गयी' असें म्हणाला. वेटरनें बिल आणलें. त्याने पैसे दिले आणि बाथरूमकडे जाण्यासाठी तो उठला.

इतका वेळ गप्प बसलेली ती तरुणी उठून उभी राहिली आणि माझ्याकडे येतां येतां म्हणाली, "ही शोकांतिका मी कधींच विसरणार नाहीं. मलाही सुगंधी स्नानाचा शौक आहे. खबरदारी घेतली पाहिजे मला 'क्लिओपॅट्रा' कधीं वापरली तर !"

मलाही काय वाटले कुणास ठाऊक. पुन्हां स्वप्नांची आठवण झाली. विशेषतां तिच्या–आणि मी सहजच बोलून गेलों. "पण स्नान करतांना दरवाजा लॉक करायला विसरूं नका कधीं" माझे बोलणें संपतां संपतांच तिचा नवरा आला. आम्ही परस्परांना 'गुड नाइट्' केले आणि ती दुक्कल 'रोशन आरा' तून बाहेर गेली. ती दूर जाईपर्यंत मी त्यांच्याकडे पहात होतों.

☆ ☆ ☆ ☆

मिस्टर आणि मिसेस प्रेम कोहली मोतीनगरमधल्या आपल्या आलिशान फ्लॅटमध्यें परतलीं त्यावेळीं दहा वाजले होते. दिल्लीच्या मानानें हा कांहीं विशेष उशीर नव्हता. गेल्या दोन आठवड्यांत कित्येक वेळां ते बारा बारा वाजल्यानंतरही घरीं परतले होते. मिसेस प्रेम कोहली म्हणजे विवाहपूर्वीची मिस् अमृता जालन. लखनौला तिच्या वडिलांचा मोटरचा बिझिनेस होता. महायुद्धांत त्यांनी खूपच कमाई केली होती. अमृताच्या उच्च शिक्षणासाठीं तिला दिल्लीच्या इंद्रप्रस्थ कॉलेजमध्यें ठेवण्यांत आले होते. तिच्या मातापितरांनीं एकदोनदां परदेशचाही दौरा केला होता. 'सित्रॉएँ' कंपनीचे हिंदुस्थानांतले ते प्रमुख विक्रेते होते. ब्रिटिश राज्यांत सरकारदरबारीं त्यांचे चांगले वजन होते. कित्येक युरोपियन अधिकारी त्यांचे दोस्त होते. कानपूरच्या कॅम्पचे कमाडन्ट लखनौला आले की त्यांच्याकडे उतरत असत. पदवी परीक्षेच्या वर्गांत असतां एका सांस्कृतिक कार्यक्रमांत गेल्या वर्षी तिची आणि प्रेम कोहलीची ओळख झाली होती. तिच्या नृत्यकार्यक्रमानंतर त्यानें तिचे अभिनंदन केले होते. नंतर त्यांचा परिचय वाढत गेला होता. डिसेंबरांत अचानक तिचे पप्पा हृदयविकाराने वारले आणि त्यानंतर सहा महिन्यांनीं माताही. लखनौचा बिझिनेस लढाईनंतर आयात धोरणामुळे संपुष्टांत आला होता. तिच्या मावशीच्या यजमानांनीं त्याच्या विक्रीची व्यवस्था करून अमृताला घेऊन ते दिल्लीला आले होते. प्रेमचें येणे-जाणे ती दिल्लीस पुन्हां आल्यानंतर अधिकच वाढलें होतें. कां कोणास ठाऊक पण तिच्या मावशीला तो आवडत नसे. अमृतानें त्याच्याशीं फार सलगी ठेवावी हें तिला पसंत नव्हते. अमृताला तिची कारणमीमांसा पटत नसे. पण मावशीला दुखवूं नये म्हणून ती बाहेरच त्याला भेटत असे. महिन्यापूर्वीं अचानक अमृतानें मावशीला आपल्या आगामी प्रेमविवाहाची बातमी सांगतांच ती संतापली. प्रेमबद्दल प्रगटपणे ती नाहीं नाहीं ते बोलली. अमृताला तिने आणाशपथाही घातल्या पण तिचा निश्चय झाला होता. प्रेमनें तिला पूर्णपणे भारून टाकले होते.

अखेर रजिस्ट्रारच्या ऑफिसांत दोन आठवड्यापूर्वीं ती विवाहबद्ध झाली आणि मावशीचें घर सोडून मोतीनगरच्या नव्या वसाहतींत तीन खोल्यांच्या आलिशान फ्लॅटमध्ये तिनें संसार थाटला. विवाहानंतर गेले दहाबारा दिवस ती जणुं स्वर्गांतच विहरत होतीं. निरनिराळ्यां हॉटेलांत जेवणे, सिनेमाला जाणें, साड्यां कापड खरेदी करणें ह्यांत त्यांचा कसा वेळ गेला कुणास ठाऊक. प्रेमच्या खर्चिक आणि शौकीन स्वभावाचा तिला आतां पूर्ण परिचय झाला होता. तिला सुख लाभावे – जरासुद्धां श्रम पडूं नये म्हणून तो सारखा तिची काळजी घेत होता. त्याच्या प्रेमाच्या बरसातींत ती अखंड न्हाऊन निघाली होती. असल्या हौशी आणि प्रेमळ प्रेमबद्दल मावशीच्या मनांत अशी अढी कां होती ह्याचे तिला राहून राहून आश्चर्य वाटत होते. परवां रात्रीची एकच घटना मात्र तिला अस्वस्थ करत होती. 'शांग्रिला' मधून जेवून परतल्यावर झोंपताना त्यानें तिच्याशीं प्रेमाच्या कानगोष्टी केल्या आणि कसा कुणास ठाऊक गप्पांचा ओघ मरणाकडे वळला. जीवन कसें अशाश्वत आहे हें तिला पटवून दिल्यानंतर परस्परांनीं मृत्युपत्र करणें कसें इष्ट आहे हें त्यानें तिला सांगितले. तिने प्रथम थट्टेवर बोलणे नेले पण तो गंभीर होता. अखेर त्याच्या निश्चयी आग्रहामुळें दुसऱ्या दिवशीं मृत्युपत्रें पक्की करायची असे त्यांचे ठरलें.

काल मृत्युपत्रावर सही करतांना तिचा हात थरथर कांपत होता. तिला आपल्या स्वप्नांची आठवण होत होती कीं ह्या मृत्युपत्राच्या कल्पनेंतील दुःखद पडछाया तिला भेडसावीत होती कुणास ठाऊक. मृत्युपत्रांत परस्परांनीं आपल्या मृत्युनंतर आपल्या मालमत्तेचा एकमेव वारस परस्परांना केले होते. एका पाकिटांत घालून त्यानें तीं कपाटांत ठेवली आणि त्यानंतर तो इतक्या प्रेमानें तिच्याशी वागला कीं, तिची सर्व भीति नाहींशी झाली होती. आजही सकाळपासून त्यानें तिचे सारखे कोडकौतुक चालवले होते. 'रोशनआरा' त्यांच्या फ्लॅटपासून लांब नव्हते. पण येतांना तिचा चालत जाण्याचा विचार फेटाळून लावून टॅक्सींतून त्यानें तिला घरी आणले. टॅक्सींत तो अगदी खुशींत आला होता. टॅक्सीवाला एकदोनदां खांकरल्यामुळें ती लाजली होतीसुद्धां आणि पलिकडे सरकली होती.

फ्लॅटचें दार उघडून ती दोघे आंत आली. त्यानें कपडे काढले. कपाटांतून व्हिस्कीची बाटली काढली. फ्रीजमधला बर्फ आणि सोडा आणल्यावर त्यानें ग्लास भरला आणि घुटके घेत प्रेम सोफावर बसला. इतक्यांत अमृताही कपडे बदलून तिथें आली. तिला पाहतांच तो म्हणाला, "तूं थकलेली दिसतेस. जा गीझर तापव आणि झकास

अनुक्रमणिका






स्नान कर. हवें तर सुगंधी क्रिस्ट्ल्स् वापर. मी मोजून देतो. आंघोळ केल्यावर तुला बरें वाटेल, शीण जाईल आणि झोपही चांगली येईल. मला जरा काम आहे. उद्यांची कांहीं कॉन्ट्रॅक्टस् वाचून काढायची आहेत. मी येतोच नंतर काम संपल्यावर."

इतके बोलून तो सोफावरून उठला आणि बाथरूममध्यें जाऊन त्यानें गीझर सुरू केला.सँडल्वूड सोप, व स्पंजही त्यानें स्टुलावरठेवला आणि कपाट उघडून 'क्लिओपॅट्रा'ची बाटली काढली. एका कागदावर तोलून त्यानें क्रिस्टल्स् काढलीं आणि बाटली टेबलावर ठेवली.

अमृताही स्नानास उत्सुक होतीच. ती थकली होती आणि स्नानामुळें हुशारी वाटेल आणि झोपही चांगली लागेल अशी तिची खात्री होती. बाथगाउन आणि टॉवेल घेऊन ती बेडरूममधून येईपर्यंत बाथ पाण्यानें भरला होता. ती आंत जातांच प्रेमनें पाण्यांत क्रिस्ट्ल्स् टाकलीं. क्षणार्धांत सुगंधी वातावरण तिथें निर्माण झालें. बाथमध्यें शिरण्याचा तिचा विचार होता पण पतीसमोर विवस्त्र कसें व्हायचे ? तिनें प्रेमकडे पाहिले आणि त्याला बाहेर जाण्यास सांगितले. जातां जातां तो हळूच तिच्या कानांत कांहींतरी बोलला त्यावरोवर 'चल्ल्, फाजील कुठला !' असे बोलून ती पलिकडे सरकली. प्रेमनें दार धाडकन् बंद केले.

गार्डेनियाच्या सुगंधाने ती भारून गेली होती. पाण्यांत शिरण्याचा विचार तिच्या मनांत आला. पाण्याला सहज स्पर्श केला. पाणी फारच गरम वाटत होते. क्षणभर ती थांबली. बाथरूममधला पंखा तिनें चालू केला. पंख्याच्या वाऱ्याने ते सुगंधी धुके खोलीभर पसरले. जणुं धूरच जिकडे तिकडे झाला असें वाटत होते.

ती कपडे काढणार इतक्यांत तिच्या नवऱ्याचा आवाज बाहेरून तिच्या कानीं पडल्यामुळे ती तशीच लाजून उभी राहिली, "अमृता, डार्लिंग माझ्या सिगरेट्स् संपल्या. मी खालून घेऊन येतो. आंघोळ मजेंत चालली आहे ना ?" बाहेरचा दरवाजा बंद झाल्याचा आवाज तिनें ऐकला. पुन्हां कांहींतरी निमित्त काढून प्रेम बाथरूममध्यें येईल आणि आपला गोंधळ उडवील ह्यासाठीं बाथरूमला चावी लावावी म्हणून ती दाराजवळ आली. आंतबाहेर तिनें पाहिले पण चावी कुठे दिसेना. मघाशी तर होती दाराला ? दिवाणखान्यांतल्या टेबलावर, बेडरूममध्ये तिने शोधले पण चावी सांपडेना. पाणी थंड होईल म्हणून तशीच ती बाथरूममध्यें आली. अजून सुगंधी धुकें बाथरूममध्यें भरलेलें होतेंच. तिनें सुखाने दोनतीनदां दीर्घ श्वास घेतला. आपल्या नाकपुड्यांतून फुफ्फुसांत सुगंध जणुं ती भरत होती. तिला गुंगी आल्यासारखे वाटूं लागले.......

आणि अचानक बाथरूममधला दिवा विझला. अंधारांत तिनें स्विच् शोधण्याची खटपट केली. मग तिला आठवले कीं, स्विच् बाहेरच्या बाजूस होता. दरवाजा वाजल्याचा तिला भास झाला. ती भिंतीला चिकटून उभी राहिली. अंधारांत कुणीतरी हलक्या पावलानें दारांतून आंत येत होतें. बाथच्या मार्गानें तीं पावलें वळलीं. वाटेंतल्या स्टुलाला कोणी तरी अडखळले. एक अस्पष्टशी शिवी ऐकूं आली. ती उघड्या दारांतून बाहेर पळाली आणि बाहेरून तिने बटन दाबला. दिवा पेटतांच प्रेमची आकृति तिला बाथजवळ दिसली. त्याचे डोळे तारवटलेले होते. आणि हात पाण्याने निथळत होते. जणुं काय आपला बेत फिस्कटला ह्या भावनेने तिरस्काराने तो तिच्याकडे पाहत होता.

क्षणार्धांत त्यानें नूर पालटला आणि चेहरा बदलून हंसत हंसत तो बोलला, "डार्लिंग अजून स्नानास सुरवातच केली नव्हतीस वाटते. मी तुझी गंमत करण्यासाठीं मुद्दाम दिवा घालवला. तुला गुदगुल्या करायचा माझा विचार होता. पण तूं कसली लबाड ! बाहेर पळालीस अं. थांब तुला आतां पकडतो." असें म्हणत तो तिच्याकडे धांवला

तिला तिचे स्वप्न आठवले. 'रोशनआरा'मधल्या त्या रसायन शास्त्रज्ञाच्या सूचनेची आठवण झाली. "दार चावी लावून बंद केल्यावरच स्नान कर !" ते परवांचें मृत्युपत्र....सगळी संपत्ति वारसाला. म्हणजे प्रेमला.....'क्लिओपॅट्रा' क्रिस्ट्ल्स्चा त्याचा आग्रह.....बाथमध्यें शोधणारे ते भयानक पंजे.....प्रेमची ती खुनी नजर......

तत्क्षणीं बाहेरच्या दाराकडे ती धांवली. दार उघडून पायऱ्या उतरूं लागली. प्रेम तिच्या पाठीं लांडग्यासारखा येत होता असे तिला वाटले. तिचा पाय घसरला आणि तोल जाऊन ती खाली पडणार तोच कोणीतरी तिला सांवरले. प्रेमचाच हात समजून ती किंचाळणार इतक्यांत तिचें लक्ष वर गेलें.

"कसल्या गडबडींत आहां, बाईसाहेब?" माझ्या परिचित स्वरानें अमृता सावध झाली होती.

"कोण ? आपण....वांचवा मला वांचवा...." असें म्हणत भीतीनें तिनें माझ्या कंबरेस विळखा घातला. मीही आश्वासित स्वरानें तिला थोपटून शांत केले. इतक्यांत तिचा पति जिन्यावरून धांवत आमच्यापर्यंत पोंचला होताच. तिला आमच्यापासून खेचून नेण्याच्या विचारानें त्यानें हात पुढे केला.

अमृतानें घाबरून डोळे मिटले आणि मिठी घट्ट केली—अगदीं एखाद्या घाबरलेल्या लहान मुलासारखी. तिच्या कानांवर स्वर पडले,

"हाच का तुमचा आरोपी ?" माझ्याबरोबरच्या शेरसिंगाचा मला प्रश्न होता.

"होय, हाच तो.....गेलीं दोन वर्षें मी त्याच्या मागावर होतो...."

"बदमाष ! ओळखलेस मला. 'ताजमहाल' मध्यें निसटलास माझ्या हातून. दिल्लीला तूं आला आहेस असे कळले. महिन्यापूर्वी कॅनॉट सर्कसवर रिक्शांत तुला ओझरता पाहिला. फैजबाजारांत ह्याच बाईसाहेबाबरोबर तुला पुन्हां पाहिल्यापासून सी. आय्. डी नीं नजर ठेवली होती. अखेर 'रोशनआरा' मध्यें आज तूं माझ्या जाळ्यांत सांपडलास. तुला बनवून गोष्टी सांगितल्या. तुझ्या मुद्रेवरचे भाव तपासले. स्वप्नाची हकिगत ऐकतांच दचकून तुझ्या हातचा ग्लास पडला आणि 'क्लिओपॅट्रा'नें तुझ्या जुन्या आठवणींना उजाळा दिला. बाईसाहेब, आपण अजूनही थरथरत आहांत. घाबरूं नका." मी म्हणालो.

"तुम्ही 'रोशनआरा'मध्यें सांगितलेत तेच खरे होणार होतें... बाथरूममध्यें...."

"शेरसिंग, पकडो इसको." मी बोलतांच प्रेम कोहलीच्या हातांत बेड्या पडल्याच.

"प्रेम कोहली उर्फ के. प्रेमनाथ उर्फ महेश ठक्कर– आपणांस् जुनागडच्या सौ. बीना ठक्कर ह्यांच्या 'ताजमहाल' हॉटेलांतल्या खुनाबद्दल आणि ह्या निरपराध स्त्रीस फसवून तिच्याही खुनाचा प्रयत्न केल्याबद्दल गिरफतार करीत आहोंत." करड्या स्वरांत मी बोललो.

"सब् झूट. मी बीना ठक्करचा खून केला नाहीं....." प्रेम बोलला.

"ती स्नानगृहांत टबमध्यें बुडून मरण पावली.......पण अधिक चर्चा चौकीवर. इथें लोकांची झोंप बिघडावयास नको. गुड नाईट्. बाईसाहेब आपण आतां वर जाऊन स्वस्थ झोपा. आपल्या रक्षणास पोलिस ठेवतो. उद्यां सकाळीं आपल्या मावशीकडे ते आपणांस आणतील तिथें मी भेटेनच. मि. पंजाबींची माझी ओळख आहे. त्यांचे आभार मानायचेत मला आरोपीची माहिती पुरवल्याबद्दल. गुड नाईट्, वन्स् अगेन."

अमृता आम्ही जीपमध्यें बसेपर्यंत आमच्याकडे पाहत होती. जीप सुरू होतांच तिनें निरोपासाठीं हात हलवला. पण तो प्रेमसाठीं नव्हता – माझ्यासाठीं.

●●●

अनुक्रमणिका











**साक्षात्कार ● खर्डेघाशी**

# अवीट व अखंड करमणूक

**गेल्या** चार पांच दशकांत मराठी कादंबरीनें अनेक वळणें घेतली, संप्रदाय निर्माण केले, तंत्राचे, मंत्राचे व कला हेतूचे तात्त्विक वाद घातले; कधी ती जीवनवादी बनली तर कधी केवळ कलावादी म्हणून मिरवली. आतां गेलीं दोन दशकें तर ती नवेनवे प्रयोग करून राहिली आहे. 'रणांगण' पासून 'कोसला' पर्यंत तिनें झेप घेतली आहे व 'क्रौंचवधा'पासून 'चक्र' पर्यंत ती आली आहे. हे सर्व नवे जुने घोळ ती घालीत बसली आहे. अजून ती बरीच घुटमळते आहे, घोटाळते पण आहे. असं असूनहि मराठी कादंबरीतील एकमेव संप्रदाय अजूनही टिकून राहिला आहे; त्या संप्रदायाचे सौंदर्यवादी संस्थापक आजही अगदी त्या संप्रदायालाच चिकटून प्रारंभीच्याच कादंबऱ्यांचे आशय त्याच तंत्रानें व मंत्रानें आविष्कृत करून चक्क घासून पुसून चकचकीत केलेल्या निष्कलंक भांड्यांत नाना रसांचें व पदार्थांचे मिष्टान्न जेवण वाढलें जावें, तशा कादंबऱ्या वर्षाकांठी दोन या हिशोबानें वाचकांच्या पुढ्यांत वाढीत आहेत. हें आणखी किती तरी काळ असेच चालणार आहे हें स्पष्ट आहे. या संप्रदायांत वाढलेलें, व त्यालाच (त्याची वाढ खुंटली असतांही), आपल्या वाढीव लेखनवयांत आजही प्रमाण मानणारे व जोपासणारे कादंबरीकार म्हणूनच श्री. वि. वा. पत्की यांचा निक्षून उल्लेख करावा लागेल.

'साक्षात्कार' ही अगदी अलिकडे प्रसिद्ध झालेली पत्की यांची दुसरी कादंबरी. मुंबई मराठी ग्रंथसंग्रहालयाच्या ललितसाहित्य प्रकाशन मालेंतील पहिलें पुष्प म्हणून 'साक्षात्कार' रसिकांस सादर करण्यांत आली आहे. शिवाय या कादंबरीला या प्रकाशन संस्थेनें जाहीर केलेलें पंचराशें रुपयांचें पहिलें बक्षीस पण मिळालें आहे. तसें पाहिलें तर या कादंबरीचें व कादंबरीकाराचें नांवही झालें आहे व तें यथायोग्य झालें आहे असेंच म्हटलें पाहिजे.

पहिली गोष्ट हें पुस्तक हातांत घेतलें म्हणजे जाणवते ती त्याची सुबक सुंदर बांधणी व मोहक मुखपृष्ठ. मराठींत अलिकडे किती आकर्षक पद्धतीनें ग्रंथ निर्मिले जातात याचें हें पुस्तक सुंदर उदाहरण मानतां येईल. रचनेच्या दृष्टीनें या कादंबरीचे कादंबरीकारानें एकूण तीन विभाग पाडले आहेत. (तंत्र जुनेंच आहे) कादंबरीचा एकूण विस्तार तीनशेंचार पृष्ठापर्यंत जातो. 'मराठी साहित्याच्या विविध क्षेत्रांत सकस वाङ्मयलेखनाची प्रवृत्ती वाढीला लागावी या एकाच हेतूनें' ही कादंबरी लेखन स्पर्धा जाहीर करण्यांत आली होती आतां त्या दृष्टीनें पाहतां मराठीच्या कादंबरीक्षेत्रांत या कादंबरीमुळें 'सकस वाङ्मय लेखनाची प्रवृत्ती' वाढीला कितपत लागते. जमेकडे काय घालायचं व खर्चाकडे कोणत्या चिजा घालायच्या हा विचार करण्यासारखा प्रश्न आहे. प्रारंभींचं एक वैशिष्ट्य म्हणून या कादंबरीबद्दल जर बोललेंच पाहिजे, तर तें बोलतां येईल तिच्या सकस व सुंदर मांडणीबद्दल व शैलीबद्दल. ही शैली अगदी 'प्रतिभासाधना'च्या पाठाबरहुकूम व त्या पंथाच्या निर्मात्याच्या निर्माण झालेल्या अर्धशेकडा कादंबऱ्याबरहुकूम तंतोतंत उतरली आहे.

म्हणजेच जो संप्रदाय आजही टिकून राहिला आहे तो हाच. पत्कींनी 'साक्षात्कार' कादंबरींत राबविलेला किंवा अधिक उजळ्या अर्थानें म्हणजे त्या संप्रदायाप्रमाणें ही कादंबरी राबविलेली, रेखलेली, आंखलेली व प्रमाणबद्धतेनें पुरेपूर यशस्वी केलेली आहे. 'साक्षात्कार' वाचल्यावर होणारा 'साक्षात्कार' तो हाच आहे, एवढाच आहे.

ही एक कादंबरी म्हणजे तसं पाहिलं तर दोन कादंबऱ्या सुद्धा झाल्या असत्या. दोघींच्या दोन कथा या कादंबरींत चपखल चातुर्यानें गुंफिलेल्या आहेत. ही गुंफण करण्याचें रचनाचातुर्य सारखं मनापुढें एकच भास निर्माण करतें कीं आपण कादंबरी वाचीत आहोंत ती कुणाची ? ही नायिका आपल्याला फडक्यांच्या कादंबरींत तर कितीदां तरी भेटली नव्हती काय ? हा नायक सुद्धां आपला पुराणा परिचित माणूस नव्हे काय ? आणि ही सारवून स्वच्छ व गुळगुळीत केलेल्या कोंकणच्या घरांतील जमिनीसारखी वाटणारी लख्ख व झक्क लेखनशैली. ती सुद्धां पूर्वींच नव्हती कां आपल्या ओळखीची झाली होती ?...अति ओळखीची झाली होती व म्हणूनच तिचे वारकावे व नखरे होऊं नयेत इतके उघडे व स्पष्ट आपल्यासमोर होत होते.

केवळ कलावादी व चार घटका अवीट व अखंड करमणूक करणारी पत्कींची ही 'साक्षात्कार' कादंबरी आणखी फारसे कांही साध्य करतें व उगीच नसती व नको ती सिद्धी मिळविण्याचा हव्यास धरते असेंहि नाहीं. या कादंबरीकाराचा हा बालबोध प्रामाणिकपणा व वाङ्मयीन सरळपणा म्हणूनच रसिकांना मानवतो, व ती वाचत असतांना तो उद्गारतो, "ठीक आहे ! तुम्हांला द्यावयाचं आहे तें रसपान तुम्ही चोखंदळ हिशेबीपणानें दिलें आहे. त्यांत तुम्हांला यश आलें आहे. आमची पण छान करमणूक झाली. चार घटका विरंगुळा तर मिळाला ! बस्स ! थँक यू !" आणखी काय लिहावयाचें 'साक्षात्कार'बद्दल ?

**—प्र. श्री. नेरुरकर**

**साक्षात्कार**

ले. : **वि. वा. पत्की**
भारतीय ग्रंथ भवन, मुंबई १४
मूल्य ६ रुपये

## दंभस्फोटक विडंबनें

**ऐन** पस्तिशींत विनोदी पुस्तकांची बत्तीशी पार पाडलेल्या विनोदी लेखकांच्या पुस्तकांच्या जत्रेंत पन्नाशींत उतरलेला विद्वान बहुश्रुत व प्राध्यापकाचा एकच विनोदी लेखसंग्रह निघावा ही मराठी विनोदाच्या जाणकार रसिकांना कांहींशी अस्वस्थ करून सोडणारी घटना आहे. चांगल्या वाचकांच्या दोन तक्रारी असतात. एक विनोदाच्या (साहित्यांत आतां विनोदाच्याच नव्हे तर शृंगार कथांपासून नरकथांपर्यंत सर्वच बाबतींत हें म्हणतां येईल) नांवाखालीं ज्यांत काडीइतकाही विनोद नसतो—असल्यास तो काडीइतकाच !— असे लेख आणि कथासंग्रह विक्षिप्त टिळ्याटोप्यांनी सजून बाहेर येत आहेत. त्यांची पैदास प्रचंड प्रमाणांत वाढते आहे. आणि अस्सल विनोदी लिखाण अगदींच तुरळक दिसत आहे. ही दुसरी तक्रार ज्यांना विनोद चांगला जमतो; किंवा अधिक वाङ्मयीन भाषेंत बोलायचें झाल्यास ज्यांना विनोदाची 'ती' सूक्ष्म दृष्टी आणि लेखणी प्राप्त झालेली आहे असे प्रा. राजाध्यक्षांसारखे साहित्यिक फारच थोडे लिहितात.

**'खर्डेघाशी'** या त्यांच्या पुस्तकांतील एकूण तेरा लेख गेल्या अठरा वर्षांत प्रकाशित झालेले आहेत एवढे सांगितले की पुरे. परंतु हेंही तितकेच खरें कीं हें एकच पुस्तक राजाध्यक्षांची सूक्ष्म निरीक्षणशक्ती, उपरोधपूर्ण मर्मव्यंजक भाषाशैली, दंभस्फोटक विडंबनें, विविधक्षेत्रांतील विविध पातळीवरून आलेल्या अनुभवांनी अलिप्त मनानें आत्मनिरीक्षण करणारी त्यांची कलात्मक प्रवृत्ती आणि मराठी व इंग्रजी साहित्याचा त्यांचा गाढा व्यासंग आविष्कार घडविण्यास पुरेपूर समर्थ आहे.

राजाध्यक्षांचें यांतील बहुतेक लेखन म्हणजे शिकारच आहे. पण त्यांच्या शिकारीचें लक्ष्य 'व्यक्ती' नसून वृत्ती आहे. या निरनिराळ्या लेखांत राजाध्यक्षांनी लेखकांच्या अनेक भ्रामक समजुतींना, आणि त्यांतही—आपल्या क्लृप्त्या कोणाच्या लक्षांत येणें शक्य नाहीं अशा आत्मानंदांत मश्गूल झालेल्या लेखकांना— जबरदस्त धक्के दिले आहेत.

लघुनिबंधांत आत्मपरता अत्यावश्यक असते. ह्याचा अर्थ न समजल्यामुळें आपले अनुभव लोकांसमोर मांडतांना लेखकाची फार पंचाईत होते. त्यामुळें त्यावर मात करता करता अनेक लेखकांनी लघुनिबंध म्हणजे आपल्या गोपीजनप्रियतेची जाहिरातच बनवून टाकली. लेखकांचें हें माप राजाध्यक्षांनी त्यांच्या पदरांत मोठ्या खट्याळपणें टाकले आहे.

एखाद्या क्षुल्लक विषयाचा विचार किती अंगांनीं होऊं शकतो आणि तो खुसखुशीत भाषेंत चुरचुरीत शब्दांत विनोदी लेखाचें रूप कसे धारण करूं शकतो, हें पहावयाचे असल्यास राजाध्यक्षांचे या पुस्तकांतील 'पुस्तकांची दुःखें', 'इतकी रद्दी पुरे झाली', आणि 'प्रस्तावना कशी लिहावी,' हे लेख वाचावेत.

वास्तविक पहाता हे वाचावे, ते वाचूं नये, ही वाक्यें पहा, किंवा उदाहरणार्थ हे विचार पहा.. यासारख्या शब्दांनीं समजूत घालण्याचे मुळीं हें पुस्तक व नव्हे. हें संपूर्ण पुस्तक पहिल्यापासून अखेरच्या पानापर्यंत वाचायला हवे. चांगल्या गवयाला चांगला साथीदार लाभावा असे पु. ल. देशपांड्यांसारखे अव्वल विनोदी लेखक या पुस्तकाचे प्रस्तावनाकार आहेत. संगीतांत गायकाच्या सुराबरोबर कानांत भरणाऱ्या पेटीच्या सुरांसारखे त्यांचे छापील शब्द कानांत भिनतात. आणि त्या सरशी राजाध्यक्षांच्या लेखणीचा थाट अधिक डोळ्यांत भरतो.

हे सर्व लेख साहित्यविषयक आहेत. (बंडू ब्रॅबॉर्न स्टेडियमला जातो—हा लेख अपवाद) परन्तु यांत कवी किंवा टीकाकार यासारख्या विषयांवर चाकोरींतले विनोदी प्रयोग केलेले दिसणार नाहींत. हे सर्व लेखन जुनें असूनही आधुनिक आणि नाविन्यपूर्ण आहे. पुष्कळ वेळां विनोदी लेखकाला एखादी कल्पना चांगली सुचते. पण ती फुलवून मांडतां येत नाहीं मग ती ओढून ताणून राबविलेली दिसते. तसा प्रकार या लेखांत आढळणार नाहीं. 'केवळ पुरुषांसाठीं !' या मासिकाची कल्पना तर मजेशीर आहेच. पण त्या मासिकाच्या स्वरुपाविषयीं जें वर्णन केलेले आहे ते देखील अत्यंत मार्मिक आहे. बुरख्याआडून उल्लेख करण्याची राजाध्यक्षांना संवय नाहीं. त्यामुळेंच ना. सी. फडक्यांचे तंत्र, गंगाधर गाडगीळांचा मुद्दाम बावळटपणा धारण करणारा 'बंडू' यासारखे उल्लेख मोकळेपणें झालेले आढळून येतात.

संपूर्ण पुस्तक बारकाईनें वाचल्यावर राजाध्यक्षांनी 'आभारां'त लिहिलेलें वाक्य मनांत कोरलें जातें. 'त्यांची (या लेखांची) घाटणी विनोदी असली तरी त्यामागे विचाराचेंही एक निश्चित सूत्र आहे असे मला वाटतें.'

खरा विनोद हा वाचकाला केवळ गुदगुल्या करीत नाहीं तर विचार करायला लावतो. साहित्यांतसुद्धां प्रवृत्तींचा पंथ होण्याची नेहमींच धास्ती असते. एकदा असा पंथ निर्माण झाला कीं मूळ हेतू नाहींसा होऊन लेखनामागील मूलभूत प्रेरणेऐवजीं बाह्य सोंगाढोंगांचे अंध आणि क्वचित् डोळस ढोंगी अनुकरण केलें जाते. मग तें साहित्य म्हणजे लघुनिबंध असो, एखादं मासिक असो, कथा असो अगर काव्य असो. 'नवी टूम म्हणजेच नवे साहित्य—म्हणजेच अक्षर वाङ्मय' असा आभास निर्माण केला जातो. अशा कोणत्याही पंथबाजीच्या आहारीं जाण्याची आणि अभिनिवेशानें त्याचाच पुरस्कार व अन्य दर्जेदार साहित्याचा आणि साहित्यिकांचा सवंग तिरस्कार करण्याची प्रवृत्ती घातकी आहे, अशा आशयाचा विचार मनावर ठसला तरी राजाध्यक्षांचें कांहीं अंशांनीं समाधान व्हायला हरकत नाहीं.

राजाध्यक्षांना नेमका हाच विचार अशा स्वरुपांतच अभिप्रेत असेल अशी खात्री मी देत नाहीं. पण हा त्यांच्या सर्वस्पर्शी आणि मर्मदर्शी लेखन विचारांचा एक भाग असावा हें मात्र निश्चितच.

परिचय फार लांबला. राजाध्यक्ष आणि या पुस्तकांचे साहित्यप्रेमी रसिक वाचक या अभिप्रायाला प्रस्तावनेप्रमाणें कोणत्या खणांत टाकतील याची भीति मात्र माझ्या मनाला अस्वस्थ करीत आहे.

पण त्यांतही राजाध्यक्षांसारख्यांच्या पुस्तकाचा आस्वाद घेण्याचें आणि सामान्य रसिकजनांना त्याचा आनंद वर्णून सांगण्याची संधी मिळाल्याचें समाधान अधिक आहे.

**—श्रीपाद भागवत**

**खर्डेघाशी**
ले. **मंगेश विठ्ठल राजाध्यक्ष**
मौज प्रकाशन गृह, मुं. ४
किं. ५ रु.



अनुक्रमणिका






## एक ( चांगला पण कांहींसा फसलेला ) प्रयोग




**मराठींत** आज नाटकांचा जमाना परत सुरूं झाला आहे. नाटकें उदंड होत आहेत. पूर्वीं एके काळीं जसे गल्ल्याबोळांतून वकील आणि डॉक्टर्स असत तसेच आज गल्ल्याबोळांतून, 'नाटककार' हें बिरुद कपाळीं लावून घेऊन माणसें फिरतांना दिसतात. एके काळीं चित्रपटांनी रंगभूमी मारली अशी ओरड होती. आतां (निदान 'मराठी' पुरती तरी) बाजी उलटलेली दिसते. चित्रपटांच्या 'प्रॉडक्शन' पेक्षां नाटकांचें 'प्रॉडक्शन' बऱ्याच प्रमाणांत वाढलें आहे. पण प्रॉडक्शन वाढलें कीं 'क्वालिटीं'त फरक पडणें पुष्कळदां अपरिहार्य असते. हें सर्वसामान्य 'माला' बाबत सुद्धां लागूं पडते. मग नाटक तर महा कर्मकठीण ! म्हणून नाटकें उदंड होत असलीं तरी त्यांत उत्तम नाटकें, चांगलीं नाटकें, बरीं म्हणतां येतील अशीं नाटकें एकूण कमीच 'होतात' ! इथें बड्याबड्यांचाही पाड लागतोच असें नाहीं. हें माध्यम वेगळें. कसोटी वेगळी आणि पराजयही मग वेगळाच मोठा. अर्थात तो पराभवही वेगळ्या अर्थानें "मोठा" कारण Low aim is crime!!

पार्ल्याच्या 'म्युझिक सर्कल' ह्या गाजलेल्या संस्थेनें विजयादशमीच्या मुहूर्तावर एक नवें नाटक मराठी रंगभूमीवर सादर केलें. मराठी नाटकाची (अत्र्यांच्या नाटकाची त्यांच्याच पत्रांतली जाहिरात सोडून) येवढी मोठी जाहिरात अलिकडे पाहिल्याचें स्मरत नाहीं. येवढी मोठी जाहिरात श्री. ना. पेंडसे ह्यांचें नांव, 'हद्दपार' ह्या गाजलेल्या कादंबरीवरील नाटक म्हणून वेगळ्या अपेक्षा; सौ. सुमती गुप्ते, चंद्रकांत गोखले, सौ. सुनीता देशपांडे आणि दत्ता भट यांच्यासारख्या नामवंतांच्या भूमिका असल्यानें त्याच्या 'प्रॉडक्शन' बद्दलचा विश्वास आणि रमाकांत देशपांडे ह्यांच्या दिग्दर्शनाबद्दलच्या कुतुहलाची त्यांत भर– ह्यामुळे हें नाटक मराठी रंगभूमीवर कांहींतरी वेगळा चमत्कार करून जाईल अशी साहजिकच अपेक्षा उत्पन्न झाली होती. (आणि ती खोटीही नव्हती.) मराठी रंगभूमीवर आजवर आलेल्या नवीन नाटकांत 'राजे मास्तर' ह्या नाटकाची जातच जरा वेगळी आहे. आणि त्या दृष्टीनें तें नाटक कांहीं वेगळे संस्कार घेऊनच येते आणि करूनही जाते.

दुर्गेश्वराच्या शाळेंत अत्यंत लोकप्रिय शिक्षक म्हणून 'राजे मास्तर' गाजतो. त्या गांवावर (विशेषतः नव्या पिढीवर) संस्कार होतात ते राजे मास्तरांचे. त्याची बंडखोरी, त्याची निष्ठा, त्या निष्ठा जपण्यासाठीं प्रसंगीं फकिरी पत्करण्याची मनाची जिद्द. नव्या परिस्थितींत नवीन मूल्यें स्वीकारण्याची, त्यांची प्रसंगी पाठराखणही करायची तयारी, व्यक्ति स्वातंत्र्यावर त्याची असलेली श्रद्धा ह्यासारख्या अनेक पैलूंनीं त्याचें जीवन हें प्रेक्षकावर कांहीं नवा व प्रभावी परिणाम करून जातें. अर्थातच कादंबरीला विस्ताराचें स्वातंत्र्य असतें. त्यामुळें तिला कांहीं फायदे उपटतां येतात. नाटकाची चौकट कांहींशी कांचणारी! त्यामुळे व्यक्त होऊं पाहणारा कतीतरी आशय 'अव्यक्त' राहतो. प्रेक्षकांनाच तो जाणून घेण्याची धडपड करावी लागते. राजे मास्तर ह्या व्यक्तीच्या जीवनांत विद्यार्थी विश्वावरचें त्याचें प्रेम हाच एक मोठा विषय आहे. त्याच्या सर्व जीवनाची धडपड (आणि परवडही) त्यांतूनच उत्पन्न झाली आहे. त्यामुळें अंगभूत संघर्ष त्यांत फारसा नाहीं असें म्हटलें तर वावगें होणार नाहीं. त्याच्या-जीवनांत नाट्य 'येते' तें 'गांवकीच्या' पावलांनी ! त्यामुळें गांवकी आणि राजे मास्तर असा हा संघर्ष होणें अपरिहार्य ठरले असतें परंतु कांहींशी गांवकी व कांहींसा वैयक्तिक असा संघर्ष रंगविण्याचा प्रयत्न नाटककारानें केलेला दिसतो. त्यामुळें मग दुसरा अंक हें एक 'पॅच' वाटतें. खलनायक ( व त्याची खलनायकी) चांगला स्थापीत (Establish) होत नाहीं. 'कोयती' च्या निमित्तानें उभें राहिलेलें वादळ हें उगीचच, चहाच्या पेल्यांतले ठरतें. मग विद्यार्थीप्रिय राजेवाड्यावर क्वचितच एखाद दुसरा विद्यार्थी डोकावून जातांना दिसतो. मास्तुरांचा निरोप ( व आठ बारा आणेवाला छोटासा हार) मनावर परिणाम करूं शकत नाहीं. आणि उगीचच कांहींतरी काव्यमय बोलून मास्तर व त्यांची पत्नी "कुठेंतरी दूर दूर" निघून जातात ह्या गोष्टी मनाला खटकतात. गांवकीच्या व मास्तरांच्या संघर्षाला कुठें गतीच आली नाहीं आणि त्यांच्या वैयक्तिक जीवनांत असा मोठा संघर्ष नाहींच. त्यामुळें ह्या नाटकाची कांहींशी ओढाताण झाल्याचें जाणवतें. एक वेगळा नायक, त्याच्या जीवनांत एकरूप झालेली त्याची पत्नी व त्या कुटुंबावर सतत प्रेमाची (अगदीं निरपेक्षा) पांखर घालणारी **म्हांबरी** ह्या तीन प्रभावी व्यक्तिरेखा घ्या नाटकांत आहेत. 'म्हांबरी' ही व्यक्तिरेखा तर मराठी रंगभूमीचे 'लेणें' ठरावें इतकी समर्थपणें नाटककारानें रंगविली आहे. मास्तर हा 'कणा' असलेला माणूस अशा माणसांचें जीवन हें नेहमींच 'आबादी'कडून 'बरबादी' कडे घरंगळत जात असतांना पाहतो. मास्तर त्यामुळेंच वास्तव वाटतात, 'आपले' वाटतात. जुन्या मताच्या पण पतिपरायण, समर्पण वृत्तीच्या पत्नीची भूमिकाही दीर्घकाळ स्मरणांत राहील. एका वेगळ्या 'प्लेन' वरचें हें नाटक आहे. आणि तें त्यादृष्टीनेंच पाहिलें पाहिजे.

एखाद्या कसलेल्या, धंदेवाईक कंपनीनें जसें नाटक द्यावें तसें हें नाटक म्युझिक सर्कलच्या कलाकारांनीं सादर केलें आहे. अगदीं दृष्ट लागण्यासारखें ! दिग्दर्शक व नेपथ्यकार सारखे रंगमंचावर 'सजीव' होऊन वावरतांना दिसतात, राजेवाड्याच्या 'सेट' देशपांड्यांनी (रमाकांत) अप्रतिम उभा केला आहे. दुसऱ्या अंकांतील खेडेगांव, तें देऊळ वगैरे सुंदरच ! त्यापेक्षां मला आवडलें दिग्दर्शनांतलें कसब ! 'कसून' तालमी घेतल्या आणि 'टीमवर्क उत्तम असले की, नाटक कसें रंगते.' ह्याचें उत्तम उदाहरण म्हणजे "राजेमास्तर" सौ. सुमति गुप्ते (मास्तर पत्नी) चंद्रकान्त गोखले (मास्तर) सौ. सुनीता देशपांडे (म्हांबरी) ह्यांच्या भूमिका अप्रतिम होतात. बाकीच्यांना फारसा 'स्कोप' नाहीं. पण श्रीकांत मोघे, दत्ता भट ह्यांचीं कामें मात्र उल्लेखनीय झाली. रंगभूमीच्या चौकटींत सारीं माणसें कशी 'नेटकी' वागली. रमाकान्त देशपांडे ह्यांचे खास अभिनंदन केलें पाहिजे.

नाटककार पेंडसे ह्यांच्या ह्या नव्या प्रयत्नाबद्दल अभिनंदन करतों. 'अजून भट्टी तापली पाहिजे असें मात्र वाटतें.'

—अभिनव गुप्त

















अनुक्रमणिका

(पान ८ वरून)

लागतो. ही सगळी जबाबदारी माझी पत्नी घेते.

**प्रश्न–** आपल्या ह्या पद्धतीमुळें कांही भास, कांहीं कल्पना, कांहीं विषय नाहीसे होतात असें आपणांस वाटत नाहीं काय?

**देशपांडे–** कांही भास जातात ना. तसे कांही गेलेही आहेत. अशा वेळीं डायरी ठेवणें बरें आहे असें वाटूं लागतें. एक ऐतिहासिक नाटक मी लिहिणार होतो. वर्गीकरणही मनांत होतें. पण आतां मात्र तें हातांतून निसटलें आहे.

**प्रश्न–** लेखनाच्या प्रती ठेवतां कां ?

**देशपांडे–** प्रती ठेवतो. 'खाद्यजीवन' हा लेख मात्र जसा लिहिला तसा पाठविला. नेहमीची पद्धत मात्र कॉपी करून लेखन पाठवणें हीच आहे.

**प्रश्न–** लेखनिक वगैरे लागतो काय ?

**देशपांडे–** नाहीं. डिक्टेशन कधीं देत नाहीं. मीच लिहितो. नाटकांतले संवाद लिहितांना ते मोठ्यानें म्हणतो तोंडानें, म्हणजे मग लय बिघडली तर चटकन् ध्यानीं येते.

**प्रश्न–** लेखन पूर्ण झालें कीं कांही लेखकांना शीण येतो तर कांही लेखकांना खूप आनंद होतो. लेखन समाप्तीनंतर कांहीं माणसें एकदम मूक होतात. आपला काय अनुभव?

**देशपांडे–** लिहून झालं रे झालं कीं तें तडक वाचून दाखविण्याची मला उबळ येते. अर्थातच माझी पत्नी ही माझी पहिली वाचक वा श्रोता ठरते. किंबहुना मला एखादी कल्पना सुचली कीं, ती मला स्वतःजवळ कधीं ठेवतांच येत नाहीं. ती मी कुणाला तरी सांगून टाकतो. भावना Share करणारा भागीदार मला लागतो. तुम्हीं आनंद करा मी जातो गिरणातीरावर असं केशवसुतांसारखं कांहीं आपल्याला जमत नाहीं–जमणार नाहीं.

**प्रश्न–** अलिकडे सगळया लेखकांचं Best शोधून काढून त्याचे संग्रह प्रसिद्ध केले जात आहेत. आपलं Best आपल्याला शोधून संपादित करायला सांगितलं तर ?

**देशपांडे–** Best is yet to be असें माझं उत्तर आहे.

**प्रश्न–** संपूर्ण काल्पनिक असें लेबल पुष्कळदा लेखनावर लावलेलं असतं. संपूर्ण काल्पनिक असं साहित्यांत खरोखरच कांहीं असतं काय?

**देशपांडे–** संपूर्ण काल्पनिक असं कांहींही साहित्यांत असत नाहीं. त्यांत प्रत्यक्ष व परोक्ष अनुभवांचं कथन असतं. बेरीज वजाबाकी, गुणाकार भागाकार तिथें असतात.

**प्रश्न–** 'व्यक्ति आणि वल्ली' ह्या पुस्तकांतल्या व्यक्तिरेखा आपण प्रत्यक्षांतून घेतल्या आहेत काय ?

**देशपांडे–** तशा त्या भेटल्य. तर मला फार आनंद होईल पण त्या व्यक्तिरेखा संपूर्णतया खऱ्या नाहींत. पण त्यांचे जीवनचित्रण मात्र कला दृष्ट्या सच्चें असावें. म्हणूनच पुष्कळांना त्या व्यक्ति खऱ्या वाटल्या. ते अनुभव खरे आहेत. जिवंत आहेत.

**प्रश्न–** आपली कांहीं भविष्यकालीन लेखनविषयक धूसर स्वप्नें आठवतात ?

**देशपांडे–** तीन तास चालेल अशी एक संगीतिका लिहायची असें माझ्या मनांत आहे. परंतु अजून ती मी लिहूं शकलो नाहीं. अपुरे लेखन पुष्कळच राहतें. पण मग मी तें पूर्ण करण्याच्या भानगडीत पडत नाहीं.

**प्रश्न–** तुझें आहे तुजपाशीं वगैरे नाटकें लिहितांनाही आपण कांही आराखडा वगैरे आंखला नाहींत ? गडकरी वगैरे मंडळी सर्व अंकांचं प्लॅनिंग करीत असत.

**देशपांडे–** कुठल्याच नाटकाचे बाबतींत असा कधीं आराखडा आंखला नाहीं. 'तुझें आहे तुजपाशीं' नाटक तर मी साडेतीन दिवसांत लिहिलें. विविध माध्यमांत कामें करण्याची मला संधि मिळाली. (रेडियो, टेलिव्हिजन, नाटकें वगैरे) त्यामुळें मला Sense of Time चांगला आला आहे असें वाटते. स्वतः नट म्हणून काम करण्याच्या अनुभवाचा उपयोग नाटकें लिहितांना फार होतो. साधा चार्ट सुद्धां मला त्यामुळें लागत नाहीं. नाटक लिहितां लिहितांच डोळ्यापुढें दिसायला लागतें.

**प्रश्न–** आपल्याला लेखनासाठी खास कांहीं एका प्रकारचें वातावरण लागते कीं काय?

**देशपांडे–** वातावरणाचाही माझा खास असा आग्रह नाहीं. नसतो. वाटींत शेंगदाणे आणि हाताशीं सिगरेटचं पाकीट असलं कीं पुरे. तळ मजल्यावरच्या हॉटेलवाल्याचा रेडिओ मोडलेला असला तर वातावरण निर्मितीला मदत होते.

**प्रश्न–** लिखाणाला तंद्री वगैरे काहीं लागतें कीं नाहीं ?

**देशपांडे–** लिखाणांतल्या तंद्रीवर माझा विश्वास आहे. योग असा कीं, बहुतेक सर्व लेखन मी संध्याकाळी केलें आहे. रात्रीपर्यंत बसून सुद्धां केलेलें आहे. आठ नऊ तास सुद्धां कधीं कधीं बसलो आहे.

**प्रश्न–** आपण चित्रपट व्यवसायांतही कथा, पटकथा, लेखक म्हणून काम केले आहे. आपला अनुभव काय आहे? पटकथा लेखन हें आनंदाचें वाटतें काय?

**देशपांडे–** चित्रपटाबाबत बोलायचं (आपल्याकडच्या) म्हणजे मोठी नाजुक गोष्ट आहे. इथे कला आणि धंदा ह्यांचं प्रमाण अगदीं Out-balanced असें आहे. तिथें लाखांचा हिशेब असतो आणि त्यामुळें तिथें वारंवार तडजोड करावी लागते. द्रव्य देणाराचा दृष्टिकोन निव्वळ धंद्याचा असतो. म्हणून मग सत्यजित रॉयबद्दल आदर वाटूं लागतो. पटकथा लेखनाचा आनंद मात्र इतर निर्मितीइतकाच मोठा आहे असें मला वाटतें. फक्त तिथें आपल्या निर्मितीच्या भवितव्याबद्दल मात्र खात्री नसते.

**प्रश्न–** आपल्या लेखनावर पूर्वसूरींचा ठसा नाहीं हें जाणवते. आपली यासंबंधींची प्रतिक्रिया काय आहे ?










**देशपांडे–** कोल्हटकर, गडकरी, चि. वि. जोशी व अत्रे, शामराव ओक या सगळयांचे लहान मोठे संस्कार असणारच. मी ह्या सगळ्यांचें लिखाण अतिशय आवडीने वाचले आहे. पण विनोदी लेखनाची दृष्टि–घडण ही विनोदी दृष्टींतूनच होत असते. ती गाण्यासारखी उपजतच असावी लागते असें मला वाटतें. मला स्वतःला अत्रे आणि गडकरी अतिशय आवडतात. अत्र्यांच्या लेखनांत बोलक्या शब्दांची Quality सांपडली आणि नट म्हणून मला ती अतिशय आवडली. अत्रे हे उत्तम वक्ते आहेत. त्यामुळे त्यांना शब्दांच्या प्रवाहाचा साक्षात्कार झालेला आहे. विनोदाला शब्द वाहते हवेत. अत्र्यांची व्याख्यानें, झेंडूची फुलें ह्या ऐन अमदानींतल्या गोष्टीनी कांहीं संस्कार झाले. पी. जी. वुडहाऊस हा माझा एक लाडका लेखक आहे. त्याची शब्दयोजना अतिशय चपखल असते. त्याच्या शब्दाला पर्याय नाहीं सुचवितां येत किंवा संक्षेप करतां येत नाहीं. मोठ्या कलेचें हें मी लक्षण मानतो. वुडहाऊस असा 'संक्षिप्त' करतां येत नाहीं. विनोदी लेखन मी तसें कमी वाचले आहे. काव्य हा माझा अधिक आवडता वाङमय प्रकार आहे. एके काळी गीतगायन हा माझा व्यवसाय होता. गात्या–बोलत्या शब्दाला मानणाऱ्या अनिल-बोरकरांच्या कवितेने माझ्यावर संस्कार केले आहेत. गीतांचे बाबतींत माडगुळकर–बढे यांना मी खूप मानतो. माडगुळकर हा तर गीतांचे बाबतींत मला एक चमत्कार वाटतो. तीन चार शब्दांत Image उत्पन्न करण्याचें त्यांचे सामर्थ्य मोठें आहे. कुसुमाग्रजांचाही संस्कार मी घेतला आहे. त्यांना तेजस्वी, राष्ट्रीय, स्थंडिल संप्रदायी करून आपण त्यांच्यावर अन्याय केला आहे असें मला वाटतें. त्यांच्या 'क्रांतीच्या जयजयकारा' इतकीच 'स्मृति' कविता मोठी वाटते. मला लोकमान्यांइतकेंच महत्त्व अपार कष्ट आणि महान तपस्या करून खांसाहेबांकडून दुर्मिळ चीजा आणणाऱ्या भास्करबुवा बखल्यांचें वाटत आलें आहे.

**प्रश्न–** गंभीर स्वरुपाचें लेखन आपण कधीं केलें नाहीं. प्रयत्न केला नाहीं ?

**देशपांडे–** गंभीर, टीकात्मक असें लेखन मी केलें नाहीं. तशी माझी प्रवृत्ति नाही. विनोदी लेखनानेंच प्रारंभ केला. आणि नंतरही जें लिहिले तें विनोदी स्वरूपाचेंच झाले. साहित्यांतल्या कांहीं अनिष्ट प्रवृत्तींची थट्टा त्यांतून केली. बदनामी नाहीं. सर्वसाधारणपणें मला गंभीर टीकात्मक लेखन वाचायलाही आवडत नाहीं. अभ्यासापुरते मी ते वाचले. इंग्रजी चरित्रें मी अधिक वाचलीं आहेत. नाट्यविषयक समीक्षा मात्र मी वाचतो. जेम्स अँगेट, टायनन् वगैरे लेखक वाचले. पाश्चात्य नाटकेंही भरपूर वाचली आहेत. पण नाटक वाचन मला विशेष आवडत नाहीं. हें सारें वाचन एक विद्यार्थी म्हणून मी केलें आहे.

**प्रश्न–** तुझें आहे तुजपाशीं व सुंदर मी होणार ह्या कलाकृतींच्या यशापयशासंबंधीं आपल्याला काय वाटते ?

**देशपांडे–** 'तुझें आहे तुजपाशीं' ह्या नाटकांतलें तत्त्वज्ञान हें अनेक गोष्टींच्या व अनेक वर्षांच्या, चिंतन-अनुभवांतून आले आहे. मागें म्हटलं त्याप्रमाणे टिळक, आणि भास्करबुवा बखले ह्या तिघांनाही मी त्या त्या साधनेंत मोठें मानीत आलो आहे. माझ्या आजोबांनी गीतांजलीतल्या एक गीतांचें भाषांतर केलं आहे त्यांतल्या एका गीताचे चरण मला आठवतात.

> **'आनंद यज्ञासि आलें निमंत्रण**
> **मानवी जीवन धन्य झालें.'** (ऋग्वेदी)

काकाजींचें तत्वज्ञान ह्यासारख्या अनेकविध विचारांतून बनत गेलें. इंदूरला मी फक्त दोन तीन दिवसच होतो. 'तुझें आहे तुजपाशीं' लिहायला सुरवात केली आणि काकाजी जेव्हां बोलायला लागला त्यावेळी इंदुरी मराठीचा संस्कार कानावर ताजा होता. मराठीच्या अनेक स्वरूपांचें मला वेड आहे. इंदुरी मराठीचा मध्य भारती डौल मला आवडला होता. काकाजी मात्र बरींच वर्षे मनांत फुलत होता. तें नाटक ज्या तऱ्हेने प्रेक्षकांच्याप र्यानीं यायला हवें होतें ती माझी इच्छा बहुतांशी सफल झाली आहे. 'सुंदर मी होणार'ची कल्पना मला नुसता 'बॅरेट' वाचूनच नव्हे तर रॉबर्ट ब्राऊनिंगची जीवन गाथा वाचून सुचली. प्रकाशाला सामोरी जाणारी कांहीं माणसें असतात. आणि कांही त्या विरुद्ध वागणारीं ! त्यांचा झगडा दाखविणें हा हेतु होता. शिवाय Purpose in Life हा विषयही त्यांत आला आहे. कवीला कविता, बेबीला बंडखोरी, सुरेशला गाणें ! त्या नव्या बदललेल्या जगांत Purpose संपला होता फक्त राजाचा ! सारीं माणसें त्याचा Purpose संपला आहे हें सांगतात आणि त्याचाच त्याला अपमान वाटत राहतो. कितीतरी नवीन व्यक्तिरेखा मी त्यांत आणण्याचा प्रयत्न केला आहे. तें केवळ भाषांतर, रुपांतर नाहीं.

**प्रश्न —** "सुंदर मी होणार" हें "तुझें आहे तुजपाशीं" इतकं यशस्वी झालं असं दिसत नाहीं, नाहीं ?

**देशपांडे –** तरी त्याचे ३००–४०० प्रयोग निरनिराळया ठिकाणीं झाले आहेत. अजूनही होताहेत. सुरुवातीला एकाच संचानें प्रयोग केले. त्यांतील दिदीचें काम माझी पत्नी करीत असे. सहा प्रयोग झाल्यावर आम्ही परदेशाला गेलों. आणि नंतर दिल्लीला गेलों. त्यामुळें प्रेक्षकांची तुडुंब गर्दी असूनहि प्रयोग थांबले. पण त्यानंतर नव्या संचांत सुरू झाले. अजूनहि चालू आहेत.

**प्रश्न —** एखादं नाटक यशस्वी होण्याच्या दृष्टीनें त्याची बांधणी कशी असावी ह्याला कांहीं आडाखा आहे का ?

**देशपांडे –** असा आडाखा नाहीं. पण नाटकांत निरुपयोगी असा भाग मुळींच असून चालत नाहीं. प्रयोगाचें संकलन उत्तम हवें, प्रेक्षकांना तीन चार तास बांधून ठेवतां आलें पाहिजे. नाटक म्हणजे खुला कारभार आहे. सूचकतेची बंधनें तिथें सैल करावी लागतात. 'नाटक आंतल्या गांठी' चें असून चालत नाहीं. शिवाय योगायोगाचा भाग आहेच !






**प्रश्न** — लेखनाची प्रक्रिया (Process) सांगतां येईल काय ?

**देशपांडे** – कसं लिहितो कळत नाहीं. विषय शोधत हिंडतां येतं असं मला वाटत नाहीं. त्यासाठीं प्रवास वगैरे कांहीं लोक करतात. पण माझा तसा विश्वास नाहीं. ही प्रक्रिया सांगणे कठीण आहे.

**प्रश्न** — टीकाकारांचा साहित्याच्या दृष्टीनें कितपत उपयोग होतो ? आपल्याला असे टीकाकार कितपत लाभले ?

**देशपांडे** – कलेच्या (कुठल्याही) विकासाला उपयोग होऊं शकतो, टीकाकार जेव्हां जास्तीत जास्त वस्तुनिष्ठता ठेवतो तेव्हां ! टीकाकाराला 'सहानुभूति' हवी असते. पण सहानुभूति म्हणजे आपण लगेच भूतदयेच्या जवळ येतो. दुर्दैवाने मराठींत असा टीकाकार एखादाच आढळतो. माझ्या टीकाकारांत **'व्यक्ति आणि वल्ली'** वरील 'आलोचने'तील टीका मला अतिशय आवडली. तिचा सूर केवळ शावासकीचा नव्हता. शंका अतिशय सूक्ष्मतेने विचारल्या होत्या. हल्लीं 'वीणे'तून 'शेष' म्हणून जे लिहितात त्यांचें टीकालेखन मला आवडते. मूळ लेखकाच्या प्रेरणांचा शोध टीकाकारानें घेणें अगत्याचें असतें असें मला वाटतें.

**प्रश्न** — आपल्याला 'बहुरुपी' प्रयोगाची कल्पना कशी सुचली ?

**देशपांडे** – 'बटाट्याची चाळ' लिहिली तेव्हां ती कल्पना मनांत नव्हती. साभिनय वाचून दाखविण्याची माझी खोड जुनी आहे. तें मी करीतही असे. ५८-५९ सालीं विलायतेंत मी **एमलिन विल्यम्स** याचा प्रयोग पाहिला. डिलन टॉमसच्या आत्मचरित्रवजा लेखनांतून एक 'वन् मॅन शो' त्यानें सादर केला. त्यावरून आपल्याकडे व्यंकटेश माडगुळकरांसारख्यांनी हें कां करूं नये म्हणून 'अपूर्वाई' त लिहिलेंहि ! मग पुढें महाराष्ट्र मंडळाचे मदतीसाठीं मी पहिला कार्यक्रम लंडन येथे केला. पॅरिसमध्यें मार्सेल मार्सोचा प्रयोग पहातांना सोबत माधव आचवलहि होते. ते म्हणाले, **"हे तूं करूं शकशील"** त्यांतून मग सुप्त इच्छा उत्पन्न झाली. व I. N. T. च्या नाट्योत्सवांत ती साकारली.

**प्रश्न** – त्यांच्या यशाबद्दल आपली प्रक्रिया काय आहे ?

**देशपांडे** –बटाट्याच्या चाळीच्या पहिल्या प्रयोगाची मला आठवण आहे. ताप होता अंगांत. तसाच दिल्लीहून विमानानें आलो. प्रयोगाचे वेळीं तोंडाला कोरड पडत होती. म्हणून आंत जात होतो सारखा ! शेवटीं एक दोन लोक आले. अगदीं अनोळखी. आणि म्हणाले "स्टेजवरच पाण्याचं भांडं आणून ठेवा. आमची कांहीं हरकत नाहीं. त्यांची प्रकृति ठीक नाहीं असं आम्हांला कळलं. आंत जाण्याचे कष्ट कशाला घेता ?" प्रेक्षकांची आत्मीयता मला वारंवार मिळत गेली आहे. जगभर खूप हिंडण्याचा योग आला. इतरांचं मी अपरंपार यश पाहिलं आहे. सौभद्राचं यश पाहिलं आहे. फार मोठीं यशं पाहिलीं आहेत. त्यामुळें मला माझें यश केवढसं आहे याची जाणीव आहे. प्रयोगाच्या ११० व्या प्रयोगाच्या वेळींही मी पहिल्या प्रयोगाइतकाच अस्वस्थ असतो. प्रत्येक प्रयोग हा पहिलाच प्रयोग आहे असें मला वाटत रहातें. तीच Sincerity, तीच भावना माझी असते. कलावंत हा जगाला कांहीं देत असतो. जगानें त्याचा स्हर्ष स्वीकार केला तर त्यांत धन्यतेचा भाग अधिक असतो. कृतकृत्यता वाटते. आज माझी भावना ती आहे.

**प्रश्न** – आपल्या ह्या लेखन संसारांत साथ करणारीं पुस्तकें व लेखकांची नावें सांगाल काय ?

**देशपांडे** – अमुकच असं सांगतां येणार नाहीं. दिसामाजि कांहीतरी वाचल्याखेरीज मी रहात नाही. त्यामुळे हे संस्कार मी मोजणार कसे ? माझा लाडका लेखक कोणी नाहीं. लेखन महत्वाचें, लेखक नव्हे.

**प्रश्न** — कला–जीवनाकडे पाहण्याचा आपला दृष्टिकोन काय ?

**देशपांडे**– मी लेखक वा नट असल्याबद्दल मला स्वतःला मनोमन आनंद होतो. पण तो आनंद मी नट आहे म्हणून होण्यापेक्षां वा लेखक आहे म्हणून होण्यापेक्षां मला परमेश्वरानें साहित्य, संगीत, नाटच ह्या गोष्टींबद्दल अपरंपार प्रेम दिलें ह्याबद्दल होतो. चांगली बैठक ऐकली कीं हे सूर ऐकण्याचे सामर्थ्य मला मिळाले ह्याचा मला सर्वांत मोठा आनंद होतो.

ज्यांना ह्यातलं कांहीं कळत नाही त्यांच्याबद्दल मला राग येत नाहीं. नियतीनें त्यांच्यावर अन्याय केला आहे. असें वाटतें.

**प्रश्न** — साहित्य, संगीत, नाटच ह्या तीन्ही गोष्टींत आपले मन सारखेंच रमते हें कसें ?

**देशपांडे** –तसा त्यांत अभेद आहे असें मी मानतो. सूर, आणि लय ह्या गोष्टी जशा संगीतांत महत्वाच्या आहेत. तशाच त्या साहित्य–नाटचांतहि महत्वाच्या आहेत असें मी मानतो.

शब्दांनाही एक प्रकारचा सूर असतो. लय असते. नाटकांत तर तें अधिक जाणवतें. ह्या साक्षात्कारांतूनच अखेर आनंद-निर्मिती होत असते. ह्यांत संगीताची ओढ मला अधिक आहे. सूर आणि लयींतून निर्माण होणाऱ्या ह्या कैवल्यस्वरूप आनंदाला तोड नाहीं.

★★★

---

( पान ६३ वरून )

कीं काय न कळे, त्यांच्या नंतरच्या **'पंख'** आणि **"पोरका"** ह्या कादंबऱ्यांनीं, **वेडचाचें घर उन्हांत, प्रेमा तुझा रंग कसा, रायगडला जेव्हां जाग येते** व **मत्स्यगंधा** ह्या नाटकांनीही मराठींत एक प्रकारचें वादळ उठवून दिलें. त्यांची सर्वच नाटकें यशस्वी झाली असें म्हणतां येणार नाहीं. पण त्यांनी फार वेगळचा पातळीवरची व वेगवेगळे प्रयोग करून नाटकें सादर केली येवढें निश्चित ! त्यांच्या पहिल्याच नाटकाने फार मोठ्या अपेक्षा त्यांच्याबद्दल उत्पन्न केल्या आणि त्या नंतरच्या "प्रेमा तुझा" व 'रायगड' ह्या नाटकांनी त्या सार्थ ठरविल्या. आतां वसंतराव पटकथा-संवाद लेखक म्हणून व्ही. शांताराम ह्यांच्या सहकार्यानें, मराठी रसिकांपुढें येत आहेत. त्यांच्या वडिलांचा काव्याचा वारसा त्यांनीं संगीतिका व अन्य काव्यप्रकार हाताळून सिद्ध केला आहे. ते उत्तम वक्ते आहेत. त्यांचे व्यक्तित्व जसे देखणे आहे तसेंच त्यांचें हस्ताक्षरहि ! त्यांच्या वाणींत एक प्रकारचा गोडवा आहे. त्यांच्या लेखणीवर त्यांचें प्रभुत्व आहे. आणि माणसाला अंतर्मुख व्हायला लावणारी जिद्द आहे. तिला अलंकाराचा सोस नाहीं. पण ती सामर्थ्याची उपासक आहे. आणि सर्वांत महत्वाचा गुण म्हणजे ती अस्सल "मऱ्हाठी" आहे. कानेटकरांनीं आजच्या नाटककारांत फार महत्वपूर्ण स्थान पटकावलें आहे तें त्यांच्या ह्या अस्सल 'देशी' बाण्यांतूनच असें आम्हांस वाटतें. आमच्या जीवनांतले संघर्ष त्यांना दिसतात, त्यांतलें नाटच त्यांना साद घालते आणि तें त्यांच्या प्रतिभेच्या मुशींतून साकारतें. कानेटकरांचा 'सन्मान' हा आधुनिक मराठी नाटकांचा जणु सन्मान आहे. "उदंड नाटकें लिहा वसंतराव" असेंच ह्या निमित्तानें आम्हीं त्यांना सुचवूं ! पुनश्च अभिनंदन ।।

**—आदित्य**

दीपावलीची



# सन्मान पुष्पें

## अनुभव "श्रीमंत" चोरघडे

**विदर्भ** साहित्य संमेलनाचे अध्यक्ष म्हणून प्रा. वामनराव चोरघडे ह्यांची जी निवड झाली त्या निवडीबद्दल 'दीपावली'तर्फे आम्हीं त्यांचें अभिनंदन करतो. वास्तविक विदर्भांत त्यांना हा मान ह्यापूर्वीच मिळायला हरकत नव्हती असें आमचें प्रामाणिक मत आहे. परंतु वामनरावांच्या वाङमयीन तपस्येला उशिरां कां होईना पण योग्य ती 'पावती' ह्या निमित्तानें मिळत आहे हेंही नसे थोडकें ! "वामन चोरघडे" हे नांव मराठी कथेच्या कालच्या व आजच्याही वाचकाला चांगलें (व चांगल्या अर्थानेंही) सुपरिचित आहे. मराठी कथेच्या संदर्भात जेव्हां 'नवकथा' हा शब्दही वापरला जात नव्हता, अशा काळांत वामनरावांनीं मराठी कथेंत तशा कांहीं नांवानें खपेल अशी कथा लिहिली आणि एक नवी मळवाट ते चालले. त्यांना कांहीं कांहीं माणसें 'गांधीवादी साहित्यिक' म्हणूनच संबोधतात. परंतु त्यांच्यांतला कथाकार हा खराखुरा 'कलावादी'च आहे ह्याची साक्ष त्यांच्या कथांचे अभ्यासपूर्ण वाचन केलें कीं ध्यानीं येऊं शकेल. गांधींच्या आश्रमांत जाऊन तेथें जीवनवेतनावर त्यांनी काम पत्करलें. खादी परिधान केली. आणि चटणीभाकर हें पक्वान्न मानलें तरी कलेविषयींची भूमिका कधीं 'प्रचारकी' झाली नाहीं. 'प्रवचनवादी' बनली नाहीं. त्यांच्या त्या वास्तव्यामुळें त्यांना पदवी मात्र मिळाली गांधीवादी साहित्यिक म्हणून ! गांधीजी व त्यांनी दिलेले तत्वज्ञान, साधनशुचिता ह्या गोष्टींवर चोरघडे यांची श्रद्धा होती व म्हणून अनेक वर्षे ते वर्ध्यास राहिले. परंतु त्या वास्तव्याचें भांडवल करून एखादें अखिल भारतीय 'राजकीय' पद मात्र त्यांनीं मिळविलें नाहीं. तसा त्यांचा पिंडच नाहीं. तो पिंड आहे जीवननिष्ठ कलाकाराचा ! आणि ह्या जीवननिष्ठेमुळेंच वामनराव चोरघडे सतत "जीवना"ला सामोरेच जात आले. जन्म नरखेडला झाला असला तरी बाळपण गेले छिंदवाड्याच्या जंगलांत. गोंड लोकांच्या भाषा संस्कृतीशीं त्यांचा त्यांतूनच परिचय झाला. शिक्षण पूर्ण झाल्यावर "राजमान्य व लोकमान्य" असलेली प्राध्यापकी त्यांनीं पत्करली नाही. ते गांधीजींच्या आश्रमांत गेले ह्यांतच त्यांच्या 'प्रकृती'चें व 'प्रवृत्ती'चें वेगळेपण दिसतें. वर्ध्याला शाळा मास्तर म्हणून काम करीत असतांना अभ्यासाबरोबरच विद्यार्थ्यांच्या शारीरिक कवायतींवरही त्यांचें लक्ष होते. कदाचित ती शाळा १९४२ च्या चळवळींत बंद पडली नसती तर आज चोरघडे ह्यांचें सारें जीवनच वेगळें झाले असतें. पण ह्या कलाकाराला समृद्ध जीवन जगण्याची संधि त्यांतूनच मिळाली. पोलीसांचा ससेमिरा टाळण्यासाठीं वामनराव फरारी झाले. पुणेंमार्गे सातार्‍याच्या 'पत्री' सरकारांत दाखल झाले. आणि मग "आज इथें तर उद्यां तिथें" करीत पुन्हां "प्राध्यापकी" पत्करली. जीवनाचे हे विविध अनुभव पचवून आज वामनराव खर्‍या अर्थानें 'श्रीमंत' झाले आहेत. 'लोककथे'ला त्यांनीं प्रतिष्ठा मिळवून दिली. त्यासाठीं खेडोपाडी ते हिंडले...राहिले. त्यांच्या परिभाषा त्यांनीं आत्मसात केल्या आणि लोककथा सजविली, शृंगारली. मराठी कथेंतही चोरघड्यांनी केलेली कामगिरी फार मोठी आहे. संस्कार, घार, अतिथी देवो भव ह्या व ह्यासारख्या त्यांच्या कितीतरी कथा मराठी वाचकाला विसरतां आलेल्या नाहींत. ह्या मागची प्रेरणा शुद्ध कलावादाची आहे हेंच त्यांचें खास वैशिष्ट्य ! राजकीय पीठावरील कलाकार आपली 'राजकीय' भूमिका पुष्कळदां विसरूं शकत नाहींत असेंच अधिक दिसतें. वामनराव चोरघडे हे ह्याला अपवाद आहेत. प्रकृतीनें ते ठणठणीत आहेत. वाणी खणखणीत आहे. वृत्ति जीवनाला सामोरें जाण्याची आहे. अनुभवांचा मागोवा घेण्याची आहे. कष्ट हेंच धन ही निष्ठा जवळ आहे. समाजजीवनाची उदंड प्रीति उरांत आहे. कलेवर अपार श्रद्धा आहे. आणि प्रयोगशील मन त्यांना लाभलें आहे. ह्या भांडवलावर **'वामन चोरघडे'** ह्यांचा कलासंसार उभा आहे. त्याला संमेलनाध्यक्षपद देऊन जणुं विदर्भानें त्या कलागुणांचाच 'गौरव' केला आहे. वामनराव तो 'सार्थ' ठरवतील असा आम्हांस विश्वास वाटतो. 'दीपावली'च्या सदिच्छा नेहमींच तुमच्या पाठीशीं राहतील. वामनराव !! ☆

## अष्टपैलु "कानेटकर"

**प्रा.** वसंत कानेटकरांना आम्हीं "अष्टपैलू" ह्या विशेषणानें संबोधलें आहे. होय ! वसंत कानेटकर हें मराठीमध्यें जे कांहीं अष्टपैलु लेखक आहेत त्यांतले एक महत्वाचे लेखक आहेत असेंच आमचें प्रामाणिक मत आहे. आणि त्यांना दिल्लीच्या संगीत नाटक अकादमीनें त्यांच्या गाजलेल्या **"रायगडला जेव्हां जाग येते"** ह्या नाटकाबद्दल यंदाचें पारितोषक दिले म्हणूनच केवळ आम्हीं हें म्हणत नाहीं. तो गौरव त्यांना मिळायलाच हवा होता. आणि यंदा प्रथमच मराठी पुस्तकाचा हा अखिल भारतीय गौरव होतो आहे ह्याबद्दलही आम्हांला आनंद होतो आहे. पण त्यांच्या कलाकर्तुत्वानें तें यश त्यांनी संपादन केलें आहे असें आम्हांस वाटतें.

आधुनिक मराठी नाटकांच्या इतिहासांत ज्या कांहीं (थोड्या) नाटकांनीं "इतिहास" घडविला आहे त्यांत वसंतरावांचें हें "ऐतिहासिक" नाटक मोडते हा आणखी एक चमत्कारच म्हणावा लागेल. सर्वसामान्यपणें सामाजिक संगीत नाटक हें असले चमत्कार करून जातें. परंतु एका वेगळ्या विषयावरचें हें आगळें नाटक (हेंही आमचें ठाम मत) हा चमत्कार करूं शकलें आहे. त्या नाटकावर खूप चर्चा-विवाद झाले. आणि तरीही त्या नाटकावर मराठी माणसाचें प्रेम जडलें आहे येवढें मात्र खरें !

वसंतरावांची साहित्यक्षेत्रांतली मुलुखगिरी मोठी वैशिष्ट्यपूर्ण अशी आहे. त्यांची घर ही कादंबरी (१९५०) प्रसिद्ध झाली. आणि एका वेगळ्या धर्तीच्या (व यशस्वी) कादंबरीची भर मराठींत पडली. वादळ उत्पन्न झाले. वसंतरावांच्या लेखणींतच वादळाचा झपाटा आहे

( पान ६२ वर पहा )

(पान १० वरून)

मैत्र महाशय वारंवार देतच होते. पण त्यांचे ऐकतो कोण ? तेवढ्यापुरते ऐकत होतो. परंतु आमचा बोलविता धनी हिमालय होता. त्यानें एकीकडे आम्हांला अवाक् केले व दुसरीकडे वाचाळ बनवून सोडले. हिमालयाचा प्रभाव हिंदू मनावर केवढा आहे, ह्याचे प्रत्यंतर तेथें आम्हांला आलें. न पाहिलेला हिमालयहि आम्हांला आमच्या परिचयाचा वाटत होता. आमच्या कथापुराणांनीं, धर्मानें व इतिहासानेंहि आम्हांला हिमालयाशीं निगडित करून ठेवलें होतें. हिमालय अनेकवार मनोमन आम्ही पहिलेलाच होता. आमच्या संस्कृतीनेंच हिमालयाशीं आमची गांठ घालून दिलेली होती. तेथले देवदार, तेथलीं दैवतें, तेथले जलप्रवाह, तेथलीं पर्वतशिखरें, आणि तपी सारे सारे आमच्या परिचयाचे होते. त्या पर्वतमालेंतून प्रवास करीत असतां असें सारखें वाटत होते कीं, एखादा तेजःपुंज मृत्युंजय मुनी बाहु उभारून आमच्यासमोर उभा राहील. आणि घनगंभीर स्वरांत आम्हांला म्हणेल, 'वरं ब्रूहि !"

अशींच दिवास्वप्नें पहात "खालच्या" सुल्तुक ठाण्यापर्यंत आम्ही पोहोचलो. दोन डोंगरांच्या कुशींत, एखाद्या दरींत, एखाद्या जलप्रवाहाच्या शेजारीं, अशी हीं ठाणीं आहेत. पर्वतांच्या बोळकांड्यांतून आंत, आंत जावे तेव्हां तेथें ठाणें असल्याचा पत्ता लागतो. ह्या ठाण्यावर डोंगराचा वरदहस्त होताच.

आम्ही वाहनांतून उतरलो व थेट "हिरव्या तंबू" त चालत गेलो. "हिरवा तंबू" म्हणजे सेनाधिकाऱ्यांचा विसांवा, त्यांचें जेवणघर, हें आतां मला पाठ झाले होते. हा तंबू आकारानें मोठा असतो. तंबूला पारदर्शक तावदानाच्या खिडक्या असतात. तंबूंत खुर्च्या, सोफे, मेज व तिवया असतात. भुईवर सतरंजा, गालिचे अथवा निदान ब्लॅंकेटें पसरलेलीं असतात. 'लाईफ' व 'टाईम' सारखीं निरनिराळीं नियतकालिकें व वृत्तपत्रें येथें वाचावयास मिळतात. अधिकाऱ्यांच्या श्रमपरिहाराची ही जागा. येथें ते पत्ते खेळतात, भोजन करतात, गप्पा मारतात. येथील ध्वनियंत्रावर संगीताचे सूर ऐकूं येतात. विजनवासांतील हें विश्राम-स्थान. एकत्र जमण्याचें ठिकाण.

बाहेर कांपविणारी थंडी थरथरत असतां ह्या तंबूचें अंतरंग तेवढें गुलाबी उष्णतेनें तेवत असते. ह्या उष्णतेला आधार "बुखारी"चा. तंबूतंबूतून मातीच्या तेलावर पेटणारी ही बुखारी माणसांना ऊब देत असते. लडाख-मध्यें झाडें नाहींत अर्थात लाकडाचें जळणहि नाहीं. जळण सारें मातीच्या तेलाचें. सैनिकांचा स्वयंपाकहि अशाच चुलीवर होतो. "बुखारी" हें तसें मोठें भडकिलें यंत्र आहे. तें धूर ओकतें. भडकतें. प्रसंगीं स्फोट होऊन फुटतें देखील. परंतु जळणें व ऊब देणें हें त्याचें मुख्य कार्य. बुखारीला मागें टाकील असें सुरक्षित अग्नियंत्र अद्याप उपलब्ध झालेले नाहीं. (झाले पाहिजे, असें जाणत्यांचें मत आहे.) तोंवर थंडीनें तत्काळ थिजण्यापेक्षां कधींतरी भडकणाऱ्या बुखारीचाच माणसें आश्रय घेणार.

तसाच आश्रय घेऊन आम्ही तंबूंत विराजमान झालो. आमचें जेवण आम्ही आमच्या-संगेंच आणले होते. पण "ही काय गोष्ट झाली !" म्हणून तेथील अधिकाऱ्यांनीं आमचा मनःपूर्वक पाहुणचार केला.

अनेक प्रकारचे मांसाहारी व शाकाहारी खाद्यपदार्थ त्यांनीं मेजावर मांडले (मुंबईभर पसरलेल्या पंजाबी खानगृहामुळें हे सारे पदार्थ आतां आपल्या परिचयाचे झाले आहेत.) आम्हीं शक्त्यनुसार त्यांचा परामर्ष घेतला. चंदीगढहून एका पंजाबी नाटक मंडळींतील नटनटीहि तेथें उपस्थित झालेलीं होतीं. ऊंच हाडापेराच्या ह्या माणसांनाहि आमच्या प्रमाणेंच धाप लागल्याचें पाहून सात्विक समाधान वाटलें.

सोफ्यावर ही मंडळी दम घेत पडली होती. त्यांच्यापैकीं रमणीजनांची तर फारच दैना उडालेली दिसत होती. तरीहि त्यांचा खेळकरपणा गेलेला नव्हता. (कुठेंहि जा नट वर्ग एकूण खेळकरच !) धापा टाकतां टाकतां त्यांचा हास्यविनोद चालूं होता. "जवानासाठीं" त्यांचा नाट्यप्रयोग व्हावयाचा होता.

"धांपा टाकत असली तरी त्या बाईचा स्वर फार बुलंद असेल." स्वरसाधक देशपांडे म्हणाले.

"कशावरून ?" मी विचारलें.

"ह्या पंजाबी बायकांचे स्वर मोठे जबरदस्त असतात !" देशपांड्यांनीं उत्तर दिले. तिचा स्वर आम्ही ऐकलाच नाहीं, धापा ऐकल्या त्या गोड वाटल्या. ह्याच सुमाराला वसंतराव सबनीस अतिशय अस्वस्थ झाले. त्यांचा चेहरा फुलला. डोकें दुखूं लागलें. डोळे लालभडक झाले. जीव घाबरला. बराच वेळ अबोलपणें त्यांनीं आपलें दुःख सहन केलें. मग ते सोफ्यावर आडवे झाले व म्हणाले, "मला बरें नाहीं. गुदमरल्यासारखें वाटतें."

आतां घाबरण्याची पाळी आमची होती. सबनीस शांतपणें निरवानिरवीची भाषा बोलत होते. खिशावर हात ठेवून ते म्हणत होते, "ह्या येथें किल्ल्या आहेत, हीं येथें तिकिटें आहेत. हे पैसे..."

" उगाच कांहीं तरी बोलूं नकोस आतां " तूं बरा होशील !" माडगूळकर-देशपांडे म्हणाले

डॉक्टरांनीं सबनीसांना प्राणवायु दिला. हळुंहळूं सबनीस ठिकाणावर आले.

"आतां मला बरें वाटतें." ते हंसत म्हणाले.

आमचे जीव भांड्यांत पडले व गाडी नव्या ठाण्याचे दिशेनें निघाली. समोरच्या आसनावर सबनीस बसले होते. पुन्हां ते हास्य-विनोद करूं लागले होते. सबनीस हा चांगला रुंद छातीचा उंचापुरा गडी आहे. मला वाटतं, सहा फुटांच्या जवळपास त्यांची उंची असेल. त्यांचा जबडा मुसोलिनीची आठवण करून देईल असा आहे. इतकेंच कीं त्या चेहऱ्यावरचे भाव अधिक आनंदी आहेत. उंची त्यांना इतक्या अवधीनंतर बाधलेली पाहून मला आश्चर्य वाटलें, पण त्यांना दम्याचा विकार आहे हें कळल्यावर ही उंची त्यांनीं इतका वेळ पचविली ह्याचेंच कौतुक अधिक वाटलें. येवढी एक वेळ सोडली, तर उंचीवरील विरळ वायुमानाचा ताण आम्ही साऱ्यांनींच बऱ्या प्रकारें सहन केला, असें म्हटलें पाहिजे. स्वतः सबनीसदेखील ह्या वायुमानाला पुन्हां कधींहि हार गेले नाहींत.

पुढचें ठाणें तसें कमी ऊंच नव्हते. तेथें पोहोंचेपर्यंत अंधार पडला होता, "खऱ्या" लडाखी रस्त्याचा अनुभव आतां आम्हांला






येऊं लागला होता. धुळीच्या ढगांतूनच आमचा प्रवास चालू होता. अग्रदीपकांच्या (Head Lights) झोतांत धुळीचे लोट उडतांना दिसत होते. पुढें धूळ, मागेंहि धूळच. वाट कुठें होती कळत नव्हतें. कर्णाच्या रथाचे चाक गिळणारी भूमि अशी असेल, ह्याची कल्पना इथें येत होती.

पक्की वाट तर येथें नव्हतीच, पण सपाट भूमीहि नव्हती. एकेक धक्का असा बसत होता कीं, क्षणांत गाडी वर उचलली जाई, तर क्षणांत खालीं आदळली जाई, उजव्या अंगाला, डाव्या अंगाला, वर, खालीं, कशीहि गाडी झुकत होती. व तशीच आमचीं शरिरें झुकत होतीं. जसे कांहीं आम्ही 'नमाज' पढत होतो. धुळीची गुलालवृष्टी वर चालूच होती. नाकांत, तोंडांत, केसांत धुळच धूळ जमली होती. कपड्यांना धुळीचा दाट रंग चढला होता. 'माती असती मातीस मिळसी' ह्या वचनाचा असा साक्षात्कार पूर्वी कधीं घडला नव्हता. मध्यविदर्भातील गाडवाटेवरची धूळ ह्या धुळीसमोर केवळ कःपदार्थ ! "धुळीस मिळणें, धूळधाण होणें, धूळ चारणें" ह्या वाक्प्रचारांचा खरा अर्थ लडाखमध्यें कळतो. तेथील भूमीनें शब्दशः आमची धूळधाण उडविली होती. वालवयांतहि आमच्या अंगावर किंवा तोंडांत इतकी धूळ कधीं गेली नसेल. त्याच अवस्थेंत आम्ही पुढच्या ठाण्यावर पोहोंचलों.

आभाळांत चंद्रकोर तरंगत होती. समोर हिमवस्त्रें ल्यालेला डोंगर उभा होता. डोंगराच्या कुशींतूनच पाण्यानें भरलेली टांगसे नदी धांवत होती. नदीच्या कांठावर राहुट्यांची रांग होती. सभोंवार पसरलेल्या फिकट चांदण्यांत तो रुपेरी डोंगर, ती पाचेची नदी, त्या प्रकाशाचे चौकोन दाखविणाऱ्या राहुट्या एकाद्या स्वप्नदृश्यासारख्या दिसत होत्या. येथेंच चिनी-भारतीय संग्राम आमच्या डोळ्यासमोर प्रथम सजीव झाला. पीतदैत्यांसमवेत लढलेले, व त्यांच्या वंदीवासांतून सुटलेले भारतीय सैनिक येथें आम्ही पाहिले. पुनश्च एकदां आम्ही सैनिकी भोजनगृहांत बसलों होतो. एकेक शिपाई आमच्यासमोर येत होता. पाय जुळवून "दक्ष"चा पवित्रा घेत होता. आम्हांला वंदना देऊन आपलें नांव सांगत होता. व आपल्या कहाणीला प्रारंभ करीत होता.

कुशल कथाकारांनींहि कान देऊन ऐकाव्यात अशा त्या कहाण्या होत्या. कथनाचें कौशल्य येथें नव्हतें, पण सडेतोड सत्यच मोठें परिणामकारक झालें होतें. एका जाट शिपायाला माडगूळकरांनीं विचारलें, "हल्ला सुरूं झाला तेव्हां तुला भय वाटलें नाहीं काय ?"

तेव्हां त्यानें उत्तर दिलें, "भय ! एकदां बमवर्षाव सुरूं झाल्यावर भय कशाचें ? दारूगोळा संपला म्हणून दुष्मन मला पकडूं शकला." हें उत्तर ऐकतांच माडगूळकरांनीं एकाद्या लहान मुलाप्रमाणें मनगटानें आंसवें पुसलीं व आम्ही साऱ्यांनीं नकळतच टाळ्यांचा कडकडाट केला.

"चिनी शिपाई आपल्या शिपायापेक्षां अधिक शूर आहेत काय !" ह्या प्रश्नाला झटक्यासरशीं उत्तर मिळालें "मुळींच नाहीं ! संख्येसमोर आम्हांला माघार घ्यावी लागली."

आमचा हा प्रश्नहि एका परीनें व्यर्थच होता. हेच भारतीय सैनिक ब्रिटिश काळांत जगभर लढले नव्हते कां ? जर्मन, जपानी, तुर्क ह्यासारख्या कडव्या लढवय्यांशीं ते झुंजले नव्हते काय ? विषम वायुमानांत व विषम परिस्थितींत त्यांनीं विजयामागून विजय मिळविले नव्हते काय ? तर मग आतांच ते उणें भरण्याचें कारण काय ? आणि आमचे शिपाई उणे भरलेहि नव्हते. अन्यत्र कांहीं चुकलें असेल. आम्हांला पराजयामागून पराजय पत्कारावा लागला तेव्हां कुठेंतरी कांहींतरी चुकलें होतें हें उघडच होतें.

"युद्धकैदी म्हणून आम्हांला पकडल्यावर चिन्यांनीं तुमचे हाल केले काय ?" या प्रश्नाला उत्तर मिळालें—

"आमच्या अधिकाऱ्यांना अपमानास्पद वागणूक मिळाली. आम्हांला बर्फावरून फरफटत, ठेंचाळत नेलें. पण नंतर छळ असा झाला नाहीं. वंद मोटारींतून आम्हांला नेण्यांत आलें. तोंडावर आच्छादनें घालून पायी देखील रखडविण्यांत आले. आम्ही नेमके कुठें जात आहोंत हें आम्हांला कधीहि कळलें नाहीं. एका सैनिकी तळावर आम्हांस उतरविण्यांत आलें. तेथें आमच्या मतपरिवर्तनाचे योजनाबद्ध प्रयत्न सुरू झाले. अनेक युद्धवंदी तेथें होते. त्यांचे गट पाडण्यांत आले. प्रत्येक गट एकेका चिन्याच्या स्वाधीन होता. प्रतिदिवशीं एकच गोष्ट आम्हांला पुन्हां पुन्हां सांगितली जात असे. चीननें भारतावर आक्रमण केलेलें नाहीं, भारतानेंच चीनवर आक्रमण केलें आहे, चीननें केवळ प्रतिकार केला. तुमचें नेहरूशासन प्रतिगामी आहे. तुमची पिळवणूक होत आहे इत्यादि."

जवानाचे हें इतिवृत्त ऐकून लाल प्रचाराविषयीं जें वाचलें होतें त्याचा पडताळा पडला. भारतीय प्रदेशाचा लचका तोडून तेथें रस्ता बांधणाऱ्या चिन्यांनीं भारतावर आक्रमणाचा उलटा आरोप करावा ह्यांत धारिष्ट अधिक कीं विनोद अधिक तें सांगणें कठीण आहे. कम्युनिष्ट देशांत मूठभर 'पक्षपात्यां'च्या (Party men) हातांत सत्ता केंद्रित झालेली असते. सर्वसामान्य माणसाची हा मिरासदार वर्ग सर्रास पिळवणूक करीत असतो. सभेचे, संचाराचे, संभाषणाचे, वा संपाचे स्वातंत्र्य चीनसारख्या लाल देशांत नाहीं. युद्धसिद्धतेसाठीं तेथील झोटिंग सामान्य माणसाला सारखा राबवीत असतो. व त्याचें रक्तशोषण करीत असतो. झारच्या हातीं नसेल तेवढी सत्ता कम्युनिस्ट सुलतानांच्या हातीं केंद्रित झालेली असते. तरीहि भारतीय शासन प्रतिगामी असल्याचें व तेथें सामान्य माणसाची 'पिळवणूक' होत असल्याचे आरोप चिन्यांनीं करावे हें त्यांच्या एकपुस्तकवादी व एकसत्तावादी धोरणांस धरूनच आहे. ह्या प्रचाराला "तुमचें म्हणणें मला पटत नाहीं. तुम्हांला भारतीय कांहींच माहिती दिसत नाहीं " असें उत्तर ह्या भारतीय शिपायाकडून मिळालें. लाल चीनमधील उपासमारीला कंटाळलेल्या चिन्यांची रांग हाँगकाँगच्या दिशेनें कशी लागली, तें ह्या जवानांना ठाऊक असेल वा नसेल. पण त्यानें प्रत्यक्ष पाहिलेल्या परिस्थितीचें वर्णन पुढील शब्दांत केलें.








"जे कांहीं आम्हांला दिसलें त्यावरून असें वाटते कीं चिनी हे अगदीं भुकेकंगाल लोक आहेत. लोकांना कपडे नाहींत. पुरेसें अन्न नाहीं. आम्ही टाकून दिलेला उष्टा भात आमचे पहारेकरी खात असत."

आपल्या कैद्यांचे उष्टे खाण्यास धांवणाऱ्या बुभुक्षित चिन्यांचें चित्र त्यांच्या तोंडी प्रचारापेक्षां अधिक बोलकें आहे. म्हणजे जो "पोटाचा प्रश्न" सोडविण्याचें वचन "तांवडे झार" देतात, तोच त्यांना सोडवितां आलेला नाहीं. वस्तुतः चिनी म्हणजे सर्वभक्षक जात. झुरळे, उंदीर, बेडूकदेखील त्यांना चालतात. वाटेल तें खाण्याच्या व वाटेल तें रांधून गोड करण्याच्या कामांत हीं माणसें निष्णात. परंतु चीनपायीं इतक्या वर्षांच्या लाल राजवटीनंतर पुरेसें अन्नधान्य तर नाहींच. पण बेडूक उंदीर देखील नाहींत. बरें, ह्या अभावाचा बोल "पिळवणूक करणाऱ्या" समाज-रचनेवर जावा, तर ती समाजव्यवस्थाहि आज चीनमध्यें अस्तित्वांत नाहीं. आणि तरीहि आपल्याच कैद्यांनीं फेकलेले उष्टे तुकडे चघळण्याइतपत चीनचे कर्मचारी वखवखलेले आहेत. आमच्या सैनिकांनीं तें दृश्य प्रत्यक्षच पाहिले हें बरें झाले. आणि ते सैनिक आम्ही पाहिले हें बरें झाले.

सैनिकांशीं भेट आटोपून दारवूकहून आम्ही निवासस्थानीं परतलों. रात्र चांदणी होती. स्वप्नासारख्या धूसर प्रकाशांत मी नदी-तटावर एकटाच उभा होतो. समोर पाणी खळखळत होतें. मागच्या अंगास राहुटयांची रांग होती. नदीच्या पात्रापर्यंत बर्फानें ओघळणारा डोंगर उतरला होता. पाणी त्याला घांसूनच वहात होते. मंद चांदण्यांत त्या महाकाय पर्वताचा रुपेरी देह तळपत होता. आकाशांत असंख्य चांदण्यांचीं टिंबें पडलीं होतीं. त्या चांदण्या, तो पर्वत, तें पाणी व त्या राहुटया सारेंच दृश्य विलक्षण होतें. कांहीं क्षण मी स्थळकाळाचें भान विसरलो. एक सैनिक बूट वाजवीत दुरून निघून गेला. माझें मन सैल केलें, घांवत सुटले. इतिहासाचा अंधुक प्रारंभकाल मी पाहिला. मी भारतीय युद्ध पाहिले, द्रौपदीचा अपमान पाहिला. भीमानें घेतलेला भयानक प्रतिशोध पाहिला. मी कुरूकुलाचा संहार पाहिला. मी कृपाचार्य, कृतवर्मा व अश्वत्थामा ह्यांचे निद्रितांच्या रक्तानें रंगलेले हात पाहिले. पांच पांडव, एक द्रौपदी व त्यांची साथ करीत जाणारे ते कुत्रे ! तो यमधर्म ! तो काळ ! एकेक पांडव गिळत होतो व काळ पहात होता. काळानें तें पाहिलें व काळ आज हें पहात होता. ह्या राहुटया, हे सैनिक, हीं शस्त्रास्त्रें ! नवें महाभारत आकारास येत होतें. हें त्याचें पहिलें पर्व होते. चीननें भारतावर आक्रमण केलें होतें. भारताला चीननें अपमानीत केले, विटंवित केले. दीर्घकालीन संघर्षाचें बीजारोपण झालें. ह्या अग्नीबीजाला अंतीं कोणतीं फळें येतील ! एकाएकी माझ्या कानांत दुसऱ्या महायुद्धानंतर ऑचिनलेक किंवा वॅव्हेल ह्यांनीं काढलेले उद्‌गार घुमले – "Next theatre of War would be Asia– India!" (पुढचें महायुद्ध आशियांत-हिंदुस्थानांत लढलें जाईल! ) त्या लढ्याची ही नांदी तर नव्हती ? दीर्घकाळ भारतांत युद्धाचें रक्त असें सांडले नव्हतें–१९५७ नंतर नाहीं! आतां एका अटळ ऐतिहासिक क्रमानें ती वेळ आली होती काय ? चीन भारताचा गळा धरून उभा होता. तिबेटला सशस्त्र छावणीचें स्वरुप आलें होते. स्वभावतःच चिनी रक्तवाद आक्रमक होता. चीनला आशियाचें प्रभुत्व पाहिजे होतें, नेतृत्व पाहिजे होते. चीनच्या मार्गात भारत उभा होता. भारत लोकराज्याचीं मूल्यें जोपासत होता, सहिष्णुता मानत होता. प्रगतिपथावरील भारत, हा गुणांनीं तसाच संख्येनेंहि उपेक्षणीय नव्हता. तर मग चीन हिंदुस्थानचा मरण मारणाचा संघर्ष अटळच होता काय ? स्वातंत्र्याची व लोकराज्याची ध्वजा लढविणें व विजयाप्रत नेणें, पिवळ्या झोटिंगवादाला मूठमाती देणें, हेंच भारताचें इतिहासदत्त कर्तव्य होतें काय ? ह्या संघर्षाचा अंतिम निर्णय केव्हां होईल. व तो कोण पाहील? हेच डोंगर, हेंच पाणी, हेच तारे ! हाच कालपुरुष ! भविष्याचें भाकीत त्यालाच ठाऊक, व नव्या पिढीच्या साक्षीनें तोच तें पाहील ! ह्या संघर्षाचा प्रारंभ आम्ही पहात होतो आणि त्याचा अंत ?

–पुन्हां बूट वाजले. हांक घुमली. माझी तंद्री मोडली. तें सारें भव्य, गूढ आणि सुंदर दृश्य मी पुन्हां एकदां डोळ्यांत सामावून घेतले व राहुटीकडे वळलो. आज ह्या राहुटींत देशपांडे माझ्या सोबतीला होते. आतां झोपेची वाट होती. पेटत्या "बुखारी"च्या सोबतीनें झोपणें म्हणजे, म्हणजे सतीचें वाण घेण्यासारखें होते. तशांत आमची "बुखारी" आज विलक्षण धूर ओकत होती. भाजून, गुदमरून मरायचें, कीं कांकडून मरायचे असा तो पर्याय होता. पांघरूणावर विसंबून आम्ही "बुखारी"ला निरोप दिला. तंबूची कनात माझ्या चेहऱ्याशीं गुजगोष्टी करीत होती. फळीला आधार देणारी डवडी घसरत होती. प्रत्येक हालचाली सरशीं 'अंथरुण' घसरत होते, देह घसरत होता. अंथरुण, टिनपाटे, फळ्या व देह, ह्यांचा तोल सांभाळत असतांच मला केव्हांतरी झोंप लागली. उत्तर रात्रीं मी दचकून जागा झालों. देशपांडे तळमळत होते. मोठाले श्वास सोडत होते. "धाप लागली आहे दादा. झोंप येत नाहीं !" ते म्हणत होते. "दादा" तरी येथें काय करणार होते ! शरीर भोग कोणी कोणाचा घेऊं शकत नाहीं. थोडा श्वास मलाहि लागला होता. "What can I do for you,, Deshpande?" मी हतबुद्धपणें विचारले. 'Nothing!' त्यांनीं उत्तर दिले.त्रिजेरी पेटवली, व ते वाहेर जाऊन आले. त्यानंतर (मला वाटते) देशपांड्यांचा डोळा लागला.

**(क्रमशः)**

---

## महत्त्वाची सूचना

**ज्यांची वर्गणी या अंकानें संपते त्यांनीं कृपया करून येत्या १० तारखेच्या आंत आपली पुढील वर्षाची वर्गणी पाठवून द्यावी. व्ही. पी. पद्धत नाहीं.**

**—व्यवस्थापक**



अनुक्रमणिका

अनुक्रमणिका

